# टॉलस्टॉयचीं नाटकें

१ आत्मनिवेदन

२ आदिकारण

## खंड पहिला

[ सुप्रसिद्ध साहित्यिक श्री. वि. स. खांडेकर यांची
टॉलस्टॉयच्या नाटकाबद्दल विस्तृत
प्रस्तावना दुसऱ्या खंडांत ]

अनुवादक—वि. म. भुस्कुटे

किंमत १२ आणे

# आत्मनिवेदन

## अंक पहिला

[ एका मोठ्या खेड्यांत पावसाळ्यामध्यें या अंकांतील हकिकत घडून येते. पीटरची खोल्या खोल्या असलेली झोंपडी, घोड्याच्या गळ्यांतील पट्टा दुरुस्त करीत पीटर एका लांकडी बांकावर बसला आहे. अनीशा व अकुलिना सूत काढीत आहेत व गात आहेत. ]

**पीटरः**—( खिडकींतून बाहेर पहात ) घोडे पुन्हां मोकळे सुटले. आपण त्यांच्याकडे जर पाहिलें नाहीं तर ते शिंगराला मारून टाकतील. निकिटा, ए निकिटा ! काय बहिरा आहे कीं काय ? ( ऐकतो. बायकांना उद्देशून ) बस् पुरे करा, कुणाला कांहीं ऐकूं येत नाहीं.

**निकिटाः**—( बाहेरून ) काय ?

**पीटरः**—घोडे आंत घेऊन ये.

**निकिटाः**—त्यांना आतां आंत आणतों. सर्व कांहीं वेळेवर होईल.

**पीटरः**—(मान हलवीत) काय ? किती झालें तरी मजूरच ! मी बरा असतों तर एकालाहि कामावर ठेवलें नसतें. यांच्याशीं सारखी उरस्फोड कुणीं करावी ? ( उठतो व पुन्हां खालीं बसतो. ) निकिटा ! ....उगाच ओरडण्यांत अर्थ तरी काय ? तुमच्यापैकीं कुणी तरी गेलं पाहिजे. जा, अकुल, घोड्यांना आंत घेऊन ये.

**अकुलिनाः**—काय ? घोड्यांना ?

**पीटर**:—मग दुसरं काय सांगतों आहे ?

**अकुलिना**:—ठीक आहे. (बाहेर जाते.)

**पीटर**:—त्या पोरांत कांहीं अर्थ नाही. नुसता उडाणटप्पू आहे. आयतं बसून खायला मिळालं तर तो इकडची काडी तिकडं करणार नाहीं.

**अनीशा**:—तुम्ही स्वत: तरी कुठं इतके चपळ आहां ! भट्टीवरच्या माळ्यावर रांगत रहायचं किंवा बांकावर धडपडत बसायचं! लोकांच्या अंगावर वसवस करीत असायचं ! याशिवाय तुमच्या हातून दुसरं काय व्हायचंय ?

**पीटर**:—तुमच्या मागं लागून काम करून घ्यायचं नाही असंच जर ठरविलं तर मग पहायलाच नको. पुढलं साल उजाडेपर्यंत आपल्या डोक्यावरील छप्पर देखील जागेवर रहावयाचें नाहीं. काय माणसं आहेत तरी ?

**अनीशा**:—माणसाला एकामागून एक हजार कामं सांगायचीं अन् त्याच्या हातून तीं झालीं नाहींत म्हणजे शिव्या देत बसायचं ! माळ्यावर निजून दुसऱ्याला हुकूम देत सुटणं सोपं आहे.

**पीटर**:—(सुस्कारे टाकीत) काय करावं, मला या रोगानं पछाडलं नसतं तर त्याला एक दिवससुद्धां मीं इथं ठेवलं नसतं.

**अकुलिना**:—(पडद्याआंत) हो, हो, अरे हो ! (शिंगरूं खेंकाळतें, घोड्यांच्या टापा व दाराचें करकरणें ऐकूं येतें.)

**पीटर**:—पाहिलं, तो कांहीं कामाचा नाहीं. मी त्याला घालवून देईन. खरोखरीच घालवून देईन.

**अनीशा**:—( वेडावून दाखवत ) म्हणे "घालवून देईन." आपण अगोदर धड व्हा व मग काय बोलायचं तें बोला.

**अकुलिना**:—(प्रवेश करते) मी तरी काय करूं ! त्यांना सर्वांना मीं आतां गोठ्यांत हाकून आणलं आहे. तो बांडा तर नेहमींच——

**पीटर**:—अन् निकिटा कोठें आहे ?

**अकुलिना**:—तो कुठं असायचा आहे ! तो तिथं रस्त्यावर उभा आहे.

**पीटर**:—तो तिथं कशाला उभा आहे ?

**अकुलिना**:—कशाला न् काय ? तो तिथं बडबड करीत उभा आहे.

**पीटर**:—ती काय सांगते तें कुणाला कांही समजायचं नाहीं. तो कुणाबरोबर बोलत उभा आहे ?

**अकुलिना**:--(तिला ऐकूं येत नाहीं) हं, काय म्हणालांत ?

(पीटर हातवारे करून तिला तेथून जाण्यास सांगतो. ती पुन्हां सूत कांतण्याकरितां चरख्यावर बसते.)

**नानी**:--( आपल्या आईकडे धांवत येते.) निकिटाचा बाप आणि आई येत आहेत. ते त्याला घेऊन जाण्याकरितां आले आहेत. होय, खरंच !

**अनीशा**:--मूर्ख कुठली !

**नानी**:--ते त्याला घेऊन गेले नाहीत तर बरंच झालं. ( हंसत हंसत ) मी तिकडूनच चाललें होतें, अन् निकिटा मला म्हणतो, "नमस्कार, अँना पेट्रोवना, माझ्या लग्नाला आलं पाहिजे व तिथं नाचलं पाहिजे बर का ? मी तुम्हांला सोडून जाणार आहें." तो असं म्हणाला अन् हंसूं लागला.

**अनीशा**:--(नवऱ्याला उद्देशून) पहा, आतां पहा. त्याचं खेटर अडलंय ! तो आतां आपण होऊनच जाणार आहे. म्हणे त्याला घालवून देणार ! तोंड पहा !

**पीटर**:--बरं जाऊं दे त्याला. जसं कांहीं आम्हांला दुसरं कुणी मिळणारच नाही.

**अनीशा**:--अन् त्याला आगाऊ पैसे दिले आहेत त्याचं काय ?

(नानी दरवाजाजवळ थोडा वेळ उभी राहून ऐकत राहते व नंतर निघून जाते.)

**पीटर**:--( रागावून ) काय, पैसेच ना ? येत्या उन्हाळ्यांत तो काम करील व फेडून टाकील

**अनीशा**:--तो गेला तर तुमचं काय, बरंच आहे. बर झालं एक खाणारा मनुष्य कमी झाला ! पण मला मात्र सर्व हिवाळाभर घोड्यासारखें राबावें लागेल. ती तुमची पोरटी, तिला तरी कुठं काम करायला पाहिजे आहे ? अन् तुम्ही तर काय, माळ्यावरच पडून राहणार ! तुमच्या मनांत काय आहे, तें मला सर्व समजलं आहे.

**पीटर**:—अजून नक्की काय तें कळलें नाहीं तोंपर्यंत उगाच बडबड करून तरी काय फायदा ?

**अनीशा**:—सर्व गोठा तर गुरांनीं अगदीं भरून गेला आहे. गाय तर तुम्ही विकून नाहींच टाकली ! हिंवाळ्याकरितां म्हणून सगळ्या मेंढ्या राखून ठेवल्या आहेत. त्यांना चरायला नेऊन आणणें, पाणी पाजविणें हें सगळं मला एकटीलाच करावं लागतें, यांतच सगळा वेळ निघून जातो. अन् तुम्ही तर त्या मजुराला कामावरून काढून टाकणार आहां. परंतु मी अगदीं सरळ सांगत्यें, पुरुषांचीं कामें मला व्हायचीं नाहींत. भट्टीवरल्या माळ्यावर मीसुद्धां जाईन व तिथं निजून राहीन. काय व्हायचं तें होऊं दे. तुम्हांला वाटेल ते तुम्ही करा.

**पीटर**:—(अकुलिनाला उद्देशून) जा अन् घोड्यांकरितां गवत घेऊन ये. कां जाशील ना ! गवत आणण्याची वेळ झालीच आहे.

**अकुलिना**:—काय गवत आणायचं ? ठीक आहे. (कोट घालते व भारा बांधण्याची रस्सी हातांत घेते )

**अनीशा**:—तुमच्याकरितां मी काम करायला तयार नाहीं. जा, तुमचं तुम्ही काय तें पहा. माझं मलाच पुरं झालंय !

**पीटर**:—बरं बरं, उगाच काय बडबड लावली आहे ? मिरगी आलेल्या मेंढीप्रमाणें उगाच बें बें काय चालविली आहे ?

**अनीशा**:—पिसाळलेल्या कुत्र्याप्रमाणें तुमचें डोकें आतां बिघडून गेलें आहे. आतां तुमच्या हातून कांहीं कामहि होत नाहीं किंवा तुमच्यापासून कुणाला सुखहि मिळत नाहीं. पोट भरून हबकायचं, बस, येवढंच तुम्हांला ठाऊक आहे.

**पीटर**:—(थुंकतो, आंगांत कोट घालतो) फुः ! देव भलं करो ! मी स्वतःच जातों अन् काय चाललंय तें पाहतों. ( जातो.)

**अनीशा**:—(तो गेल्यानंतर) लांब नाकाचं गचाळ भूत मेलं !

**अकुलिना**:—कां बाबांना अशी कां तूं शिव्या देतेस ?

**अनीशा**:—गप्प तोंड मीट, अजागळ कुठली !

**अकुलिना**:—तूं त्यांना कां शिवीगाळ करीत आहेस हें मला ठाऊक आहे. तूंच स्वतः अजागळ आहेस. कुत्री कुठली! तुझी कांहीं मला भीति वाटत नाहीं.

**अनीशा**:—काय म्हणतेस? (उडी मारते व तिला मारण्याकरितां कांहीं तरी हुडकूं लागते.) नीट जपून अस, नाहींतर या कलथ्यानं देईन दोन ठेवून.

**अकुलिना**:—(दार उघडून) कुतरडी, डाकीण! होय, तूं अगदीं तशीच आहेस! डाकीण! कुतरडी! कुतरडी! डाकीण! (पळून जाते.)

**अनीशा**:—(विचार करते.) "माझ्या लग्नसमारंभाला ये अन नाच" काय हा नवा बेत, आहे तरी काय? काय लग्न? बरं, नीट लक्ष्यांत ठेव बरं निकिटा, असा तुझा बेत असेल तर मी कुठं तरी काळं करत्यें........ नाहीं, मी त्याच्याशिवाय राहूं शकत नाहीं. मी त्याला हातचा जाऊं देणार नाही.

**निकिटा**:—( प्रवेश करतो, मागेंपुढें पाहतो, अनीशा एकटीच आहे असें पाहून तिच्याकडे झटकन् जातो आणि हळू आवाजांत) हें असं आहे! मी मोठ्या पंचायतींत पडलों आहें! माझे वडील मला येथून घेऊन जाण्याकरितां आले आहेत. मी घरी आलें पाहिजे असं ते म्हणत आहेत. मीं लग्न करावं आणि घरींच रहावं असं मला ते सरळसरळ सांगत आहेत.

**अनीशा**:—बरं, जा आणि लग्न कर. मला काय त्याचं?

**निकिटा**:—काय असं! या प्रकरणाची कशी वासलात लावावी याचा मी विचार करीत आहें अन् ही काय म्हणते पहा! जा अन् लग्न कर! हें असं काय म्हणून? (डोळे मिचकावीत) काय ही मला विसरून गेली!

**अनीशा**:—होय, जा आणि लग्न कर! माझं काय अडलं आहे?

**निकिटा**:—कां, अशी बिथरल्यासारखी कां करते आहेस! पाहिलं, कशी समजूतहि घालूं देत नाहींस! ........ काय, झालंय तरी काय?

**अनीशा**:—झालंय काय डोंबल! आतां तूं मला फसवूं पहात आहेस! ........ जर तसं तूं करीत असशील तर माझं काय, तुझीहि मला गरज नाहीं. काय, आतां कळलं?

**निकिटा**:—बस्स, पुरें कर, अनीशा. मी तुला विसरेन असं तुला वाटतं ? माझ्या जिवांत जीव आहे तोंपर्यंत माझ्या हातून कधींहि असं होणार नाहीं. मी तुझ्याशीं बेइमान होणार नाहीं हें अगदीं खास ! समजा मला ते घेऊन गेले व त्यांनीं मला लग्न करण्यास भाग पाडलें तरीहि मी परत तुझ्याकडेच येईन. पंचाईत इतकीच कीं त्यांनीं मला घरींच राहण्यास भाग पाडूं नये.

**अनीशा**:—तुझें एकदां लग्न झाल्यावर मग तुझ्याशीं मला काय करायचंय !

**निकिटा**:—मग आतां एक मार्ग आहे. पण वडिलांच्या इच्छेविरुद्ध तरी कसें जावें ?

**अनीशा**:—होय, सगळं अगदीं बापाच्या आंगावर टाकून द्यायला बरं आहे. हें सगळं आपलंच काम आहे, हें तुला माहीत आहे. ती तुझी हिडीस कारटी मरीना! तिच्याबरोबर तुझी आज कित्येक दिवस खलबतं चालू आहेत तिनेंच हें सर्व तुला करायला लावलं आहे. परवां ती इथं आली नाहीं, तें उगीच नाहीं.

**निकिटा**:—मरीना ! तिचा माझा काय संबंध ? मला तिच्याशीं काय करायचंय ?.......अशा पुष्कळ पोरी माझ्याभोंवतीं घोंगावत फिरत आहेत.

**अनीशा**:—मग तुझे वडील इथं कसे आले ? तूंच त्यांना इकडे यायला सांगितलंस. तूंच हें सर्व केलंस अन् मला फसवलंस ! (रडूं लागते.)

**निकिटा**:—अनीशा, देवाची शपथ घेऊन सांगतों. मग तर झालं ना ! माझ्या स्वप्नांतसुद्धां ही गोष्ट कधीं आली नाहीं. खरी गोष्ट अशी आहे, माझ्या म्हाताऱ्या वडिलांनीं आपल्या टकल्यांतूनच ही कल्पना काढली आहे.

**अनीशा**:—जर तुझी स्वतःचीच इच्छा नसेल तर तुझ्यावर कोण जबरदस्ती करणार ? गाढवाप्रमाणें तुला त्यांनीं हाकून नेणें तर शक्य नाहीं.

**निकिटा**:—तरी पण आपल्या आईबापांच्या इच्छेविरुद्ध जाणें अशक्य आहे, असें मला वाटतें. माझ्या इच्छेनें तर ही गोष्ट मी करीतच नाहीं.

**अनीशा**:—मग तूं कांहीं मागें घ्यायला तयार नाहींस. आतां काय बोलायचं राहिलं ?

**निकिटा:**--होय, असाच एक मनुष्य आमच्या गांवींहि होता व तो जागचा हलायलाहि तयार नव्हता. अन् गांवच्या पाटलानें त्याला लपवून ... मग याचाहि असाच परिणाम होईल. असं व्हावं अशी माझीहि इच्छा नाहीं. अशी गोष्ट एकाद्याच्या अंतःकरणाला अगदीं लागून राहते, असें म्हणतात...

**अनीशा:**—बस, बडबड बंद कर. निकिटा, ऐकून ठेव, जर तूं त्या मरीनाशीं लग्न करशील तर माझ्या जिवाचें मी काय करीनन् काय नाहीं हें मला सांगतां येत नाहीं. मी जीव दिल्याशिवाय राहणार नाहीं. मीं पापाचरण केलें आहें. मीं कायद्याविरुद्ध वागल्यें आहें. अन् आतां मला मागें परतणें शक्य नाहीं. जर तूं निघून जाशील तर माझ्या जिवाचं काय होईल.....

**निकिटा:**—मी कां म्हणून जाईन ? मला जायचंच असतं तर मी मागंच गेलों असतों. इव्हॅन सेमोनिशनें मला परवांच कोचमनची नोकरी देऊं केली होती....ही नोकरी मिळाली असती तर किती मजा झाली असती, तूंच कल्पना कर ! पण मी गेलों नाहीं कारण मी कोणाकडेहि गेलों कीं त्यांना मी पुरून उरेन हें त्यांना माहीत आहे. आतां तुझें माझ्यावर प्रेम नसेल तर मात्र गोष्ट निराळी !

**अनीशा:**—होय, मग आतां तूं हें लक्ष्यांत ठेव. माझा म्हातारा नवरा मला वाटतें आतां लवकरच मरेल ! मग नंतर आपल्या पापावर आपल्याला झांकण घालतां येईल. मग सर्व कांहीं कायदेशीर व यथायोग्य करून घेतां येईल आणि नंतर तूं इथला मालक बनशील.

**निकिटा:**—उगाच बेत करून करायचंय काय ? मीं कशाला त्याची काळजी करूं ? आपलंच जणूं काम समजून मी इथं काबाडकष्ट करीत आहें. माझ्या धन्याचें माझ्यावर प्रेम आहे व माझ्या धनिणीचंहि माझ्यावर प्रेम आहे. अन् गांवांतल्या सटबाया माझ्या मागें मागें फिरत असल्या तर त्यांत माझा कांहीं गुन्हा नाहीं.

**अनीशा:**--अन् तुझं माझ्यावर प्रेम राहील ना ?

**निकिटा:**--(तिला आलिंगन देऊन) हें काय विचारतेस ? तूं तर माझें हृदयच बळकावून...........

**मॅट्रियोना:**—( प्रवेश करते. क्रॉसचें चिन्ह करून मूर्तीपुढें बराच वेळ उभी राहते. निकिटा व अनीशा एकमेकांपासून दूर होतात. ) जें कांहीं मला दिसलं तें मीं पाहिलं नाहीं व जें कांहीं माझ्या कानावर पडलं तें मीं ऐकलं नाहीं. काय पोरीबरोबर मजा चालविली आहे हं ! वांसरूंसुद्धां असंच उड्या मारीत असतं. तरुणपणीं माणसानं थोडी गंमत केली म्हणून कांहीं बिघडत नाहीं. पण सोन्या, तुझा धनी परसांत तुला हांका मारीत उभा आहे.

**निकिटा:**—मी कुऱ्हाड आणण्याकरितांच काय तो आंत आलों होतों.

**मॅट्रियोना:**—मला ठाऊक आहे सोन्या, मला ठाऊक आहे, नसल्या प्रकारच्या कुऱ्हाडी सुद्धां ज्या ठिकाणीं बायका असतात त्या ठिकाणींच सांपडतात.

**निकिटा:**—( कुऱ्हाड उचलण्याकरितां वांकतां वांकतां ) आई, मी तुला विचारतों तुम्ही माझं लग्न करणार आहां हें खरं आहे कां ? याची कांहीं अगदीं जरूरी आहे असं मला वाटत नाहीं. शिवाय मला लग्न करण्याची इच्छाहि नाहीं.

**मॅट्रियोना:**—हें पहा बाळ, लग्न करूनच काय करायचंय ? हा सगळा त्या म्हाताऱ्याचा विचार आहे. सोन्या जा, तूं आपल्या कामाला जा. आम्हांला काय बोलायचं तें आम्ही बोलूं. तूं इथं नसलास तरी चालेल.

**निकिटा:**—हें तर मोठें विलक्षणच आहे. पहिल्या क्षणांत माझं लग्न करण्याच्या गोष्टी. बस, दुसऱ्या क्षणांत तो सर्व बेत पार बदलून गेला ! मला या गोष्टीचा अंदाजच कांहीं लागत नाहीं. ( जातो. )

**अनीशा:**—मग हें सगळं काय चाललं आहे ? तुम्ही खरोखरीच त्याचें लग्न करणार आहांत कां ?

**मॅट्रियोना:**—अग, पण त्याचें लग्न करून करायचंय काय ? त्यांत कांहीं अर्थ नाहीं. हे सर्व माझ्या म्हाताऱ्याचे बेत आहेत. त्याला आतां लागलाय म्हातारचळ ! " लग्न करा, लग्न करा " पण नवऱ्या मुलालाच ठिकाण नाहीं अन् याचे आपले बेत चाललेच आहेत. जिथं गवतन्, दाणान्, पाणीन् भरपूर आहे तें सोडून घोड्यांनीं इकडं तिकडं कां भटकत रहावं ? जिथं खायला प्यायला भरपूर आहे अन् शिवाय कुणबावाहि करतां येतो तिथं दुसऱ्याच्या

तोंडाकडे काय म्हणून पहावें ! तशीच इथली गोष्ट आहे.(डोळे मिचकावते.) वारा कोणत्या दिशेनें वहात आहे हें मला दिसत कां नाहीं ?

**अनीशा:**—तुमच्यापाशीं झांकून ठेवून करायचं काय ! मॅट्रियोना, माई, तुम्हांला हें सर्व माहीत आहे. मीं पाप केलं आहे. तुमच्या मुलावर माझं प्रेम माहे

**मॅट्रियोना:**—माझे लाडके, ही बातमी मला नवीन नाही. माई मॅट्रियोनाला ही गोष्ट ठाऊक नाहीं अशी कां तुझी समजूत आहे ? हें बघ मुली, यांतली खडान्खडा बातमी मला आहे. तीन फूट जाड विटांच्या भिंतींतून ही माई मॅट्रियोना पाहूं शकते येवढी एक गोष्ट तूं लक्ष्यांत ठेव म्हणजे झालें. हें सगळें मला माहीत आहे. गुंगी आणण्याचीं औषधें तरुण बायकांना कां लागतात हेंहि मला माहीत आहे म्हणून तेंहि थोडें औषध मीं आपल्या-बरोबर आणलें आहे. (आपल्याजवळची पुरचुंडी सोडते व कागदाच्या पुड्या बाहेर काढून ठेवते.) जेवढें पहायला पाहिजे तेवढेंच मी पहात असतें व बाकीचें जें पहावयाचें नसतें किंवा ज्याकडे लक्ष्य द्यावयाचें नसतें तिकडे मी ढुंकूनहि पहात नाहीं. ऐकलंस कां ! माई मॅट्रियोनासुद्धां एकदां तरुण होती. माझ्याहि म्हाताऱ्या वेडप्याजवळ असतांना कसं वागायचं हें मीं ठरवून ठेवलं होतं. एक ना दोन असल्या अनेक युक्त्या मला माहीत आहेत. परंतु तुझा म्हातारा अगदींच पिकलेलं पान झाला आहे ! या असल्या नवऱ्याबरोबर माणसानं रहायचं तरी कसं ! गवत उलटण्याच्या लांब दांड्याच्या चिमट्यानें तूं त्याला टोंचलेंस तर त्याच्या आंगांतून रक्त सुद्धां बाहेर पडायचं नाहीं. येत्या वसंतऋतूच्या आधींच त्याची बहुतेक गच्छंती होईल. नंतर घरांत कारभार पहायला कोणी तरी लागेलच. बरं, त्या दृष्टीनं माझ्या मुलांत काय दोष आहे? इतर चार माणसांसारखाच तो आहे. त्यांच्या सारखेंच तोहि काम करील. तेव्हां अशा या चांगल्या घरांतून त्याला काढून नेण्यांत फायदा काय ? माझ्या पोराची मी वैरीण कां आहें !

**अनीशा:**—हो ! पण हें सगळें, तो गेला नाहीं, तर !

**मॅट्रियोना:**—गडे, तो मुळींच जाणार नाहीं ! त्या सर्व वायफळ गप्पा आहेत. माझा म्हातारा तुला माहीतच आहे. त्याचं डोकं हें असंच चालत

असतं. एखाद्या वेळीं त्याच्या डोक्यांत असं कांहीं शिरून बसतें कीं, हातोडा मारून तें काढून टाकूं असं कोणीं म्हटलं तरी तें निघायचं नाहीं.

**अनीशा:**—पण ही भानगड निघाली कशी ?

**मॅट्रियोना:**—बरं, हें पहा बाळ, बायकांच्या बाबतीत माझ्या मुलाचं वर्तन कसं असतं, हें तुला ठाऊकच आहे. तो चांगला देखणा आहे बरं, तो एकदां रेल्वेमध्यें नोकर होता. अन् एक पोरगी बरीक त्याच्याकडे स्वैपाकाला होती. अन् तीच पोर आतां तेथून पळून येऊन याच्या मागें लागली आहे

**अनीशा:**—मरीना ?

**मॅट्रियोना:**—होय, पटकी येऊं दे मेलीला ! या दोघांमध्यें कांहीं भानगड झाली कीं नाहीं, माहीत नाहीं. परंतु माझ्या म्हाताऱ्या नवऱ्याच्या कानावर ही गोष्ट गेली. शेजाऱ्यापाजाऱ्यांकडून त्याला ती कळली असेल किंवा त्या पोरीनेंच स्वत: येऊन त्याच्याजवळ कांहो तरी सांगितलें असेल !

**अनीशा:**—होय, ती कारटी मोठी धिटूकली आहे !

**मॅट्रियोना:**—मग माझा म्हातारा काय, जास्तच बिथरला. "आपलं पाप झांकून टाकण्यासाठीं त्यानं लग्नच केलं पाहिजे," असें तो म्हणूं लागला. 'आपल्या मुलानं तिच्याशीं लग्न केलंच पाहिजे,' असंच तो म्हणत सुटला. "आपण त्याला घरीं घेऊन जाऊं. तिथ असल्यावर त्याला लग्न करावंच लागेल." त्यानं आपला आग्रह सोडावा म्हणून मीं माझ्या हातून होईल तेवढी खटपट करून पाहिली. पण काय सांगूं, तिचा कांहीं उपयोग झाला नाहीं. बरं ठीक आहे. आतां मी दुसरीच एक युक्ति योजायचं ठरविलें आहे. असल्या मूर्खांना असंच फसवावं लागतं. त्यांचं आपलं बरोबर जमतं असें दाखवायचं अन् मूळ मुद्द्याची गोष्ट आली म्हणजे एकदम फिरून पडायचं. म्हणजे आपोआप सगळं आपल्या मनासारखं जमून येतें. बायकांना काय चुलीपुढें बसल्या बसल्या शेंकडों युक्त्या सुचतात. त्याच्यासारख्या म्हाताऱ्याला तें काय सुचायचंय ! "कांहीं हरकत नाहीं, हें काम जुळलं तर बरंच झालं. परंतु तें जमविण्यापूर्वी त्याचा पूर्ण विचार करणें जरूरीचें आहे. असं जर आहे तर मुलाकडे स्वतःच जाऊन त्याला कां विचारूं नये ? पीटर इग्नॅटि-

शलाहि भेटूं त्याच्याशीहि बोलूं. तो काय म्हणतो तें पाहूं," असं मी त्याच्याजवळ बोललयें. अन् आम्ही इथं आलों.

**अनीशाः**—माई, माई, या प्रकरणाचा शेवट तरी काय होणार? त्याच्या बापानें समजा तिच्याशी लग्न करण्याची त्याला आज्ञाच केली तर?

**मॅट्रियोनाः**—आज्ञा! खरंच! त्याची आज्ञा! घाला ती चुलीत. तूं कांही काळजी करूं नकोस; ती गोष्ट तर केव्हांच व्हायची नाही. तुझ्या म्हाताऱ्याजवळ मी स्वतःच जातें अन् या गोष्टीचा चांगला निकाल लावून घेतें. मागें कांहीं भानगड ठेवीत नाहीं. इथं कसं काय चाललंय हेंच फक्त पाहण्याकरितां मी आलयें आहें. माझी जशी कल्पना होती तेंच बरोबर इथं चाललं आहे. माझा मुलगा इथं सुखांत आहे व सुखांत राहीलहि. अस असतांना त्या ढालगज भवानीबरोबर मी त्याचें लग्न काय म्हणून लावून देईन? अगदीं भिऊं नको. मी कांहीं वेडी नाहीं.

**अनीशाः**—अन् ती, मरीना! त्याच्या नादीं लागून इथं आली. माई, काय सांगूं, तुम्हांला खरं वाटायचं नाहीं. जेव्हां त्याच्या लग्नाच्या गोष्टी लोक बोलूं लागले त्या वेळीं माझ्या छातीत कुणी तरी सुरी खुपसत आहे असं मला वाटलें. मला वाटलें तोहि तिच्याच मागें आहे.

**मॅट्रियोनाः**—हें पहा बाळ, निकिटाला तूं इतका मूर्ख समजूं नकोस. घर ना दार, असल्या अनाथ कारटीच्या मागें तो लागेल असं तूं समजूं नको. निकिटा चांगला शहाणा आहे, समजलास! कुणावर प्रेम करावं हें त्याला चांगलं समजतें. तेव्हां उगीच घाबरून जाऊं नको. आम्ही त्याला घेऊन जाणार नाहीं किंवा त्याचें लग्नहि करून देणार नाहीं, त्याला आम्ही इथंच ठेवूं, फक्त तुम्ही थोडे पैसे आम्हांला दिले, म्हणजे आम्ही त्याला इथं ठेवूं.

**अनीशाः**—निकिटा येथून निघून गेला म्हणजे त्याच्यामागें मी इथं जिवंत राहू शकणार नाहीं. येवढंच काय तें मला समजतं, मला दुसरं कांहीं समजत नाहीं.

**मॅट्रियोनाः**—साहजिक आहे. तरुण माणसांचं हें असंच व्हायचं! तूं आपल्या अगदीं भर जवानींत असलेली बायको, अन् त्या तसल्या खरवड माणसाशीं तुझी गांठ पडली आहे.

**अनीशाः**—माई मॅट्रियोना, काय सांगूं! तुम्हांला खरं वाटेल कां? मी त्याला इतकी कंटाळल्यें आहें, त्या लांबनाक्या कुतरड्याला मी इतकी कंटाळल्यें आहे कीं त्याच्याकडं पहावं असं देखील मला वाटत नाहीं.

**मॅट्रियोनाः**—होय, तें मी पाहतेंच आहें. असला प्रसंग आला म्हणजे हेंच व्हायचं. हें पहा, (आजूबाजूला पाहते व तिच्या कानाशीं कुजबुजते.) मी त्या म्हाताऱ्याकडे गेलें होतें. तुला तो ठाऊक आहे? त्यानं मला दोन प्रकारच्या पुड्या दिल्या आहेत. या पुड्या, पाहिलंस का, या पुड्या गुंगी येण्याच्या आहेत. "या पुड्यांपैकीं एक पुडी त्याला दे" अन् त्याचं म्हणणं असं कीं, "त्याला इतकी गाढ झोंप येईल कीं, तूं त्याच्या आंगावर नाचलीस तरी त्याला तें समजायचं नाहीं!" अन् या दुसऱ्या पुड्या "या त्या प्रकारच्या पुड्या आहेत. या त्याला पिण्याच्या पदार्थांत घालून द्यायच्या. या औषधाला मुळींसुद्धां वास नाहीं. पण त्याचा गुण मात्र जबर आहे. त्याच्या या सात पुड्या आहेत. एका वेळेला एक पुडी, त्याला या सात पुड्या द्या." मग त्याच्या कचाट्यांतून सुटायला तुला वेळ लागायचा नाहीं." असं त्याचं म्हणणं आहे.

**अनीशाः**—ओ हो! बघूं बघूं काय आहे तें?

**मॅट्रियोनाः**—बस् अगदीं गुपचुप! त्यानें या औषधाकरितां एक रूबल घेतला. यापेक्षां कमी किमतीला तें देतां येत नाहीं असें तो म्हणाला. असलीं औषधें मिळणें कांहीं सोपी गोष्ट नाहीं समजलीस! मीं स्वत: पैसे देऊन हें औषध आणलें. जर तूं तें घेशील तर बरंच नाहीं तर मी तें म्हाताऱ्या मायकेलच्या मुलीला देऊन टाकीन. असा मीं विचार केला.

**अनीशाः**—ओ ऽ ऽ हो! यांतून दुसरी कांहीं भानगड तर उत्पन्न होणार नाहीं ना? मला तर बाई भीति वाटते!

**मॅट्रियोनाः**—खुळी कुठली! यांत भानगड कसली आली आहे! तुझा तो म्हातारा नवरा चांगला रंगेल असता कीं नाहीं तर गोष्ट निराळी होती. परंतु तो धड मरतहि नाहीं व धड जगतहि नाहीं. त्याचा आतां या जगांत कांहीं उपयोग नाहीं. आणि असल्या गोष्टी तर नेहमींच घडत असतात.

**अनीशा:**—माझ्या डोक्यांत तिडीक उठली. मॅट्रियोना माई! मला तर बाई भीति वाटते! दुसरीच कांहीं तरी भानगड उपस्थित व्हावयाची! नको बाई! तसलं कांहीं नको.

**मॅट्रियोना:**—बरं, तुझी मर्जी, मी त्याला त्या परत देऊन टाकीन.

**अनीशा:**—अन्, त्या दुसऱ्या पुड्यांप्रमाणें याहि पाण्यांतूनच द्यावयाच्या?

**मॅट्रियोना:**—चहांत दिल्यास तर बरें असें तो म्हणतो. "कांहीं समजावयाचें नाहीं. वास नाहीं, कांहीं नाहीं." तो मोठा धूर्त व हुशार म्हातारा आहे.

**अनीशा:**—(पुड्या घेते.) काय करूं या कपाळाला! सारखं दुखत आहे. माझ्या संसाराचा असा बोजवारा झाला नसता तर ही गोष्ट करावयाची माझ्या मनांतहि आलं नसतं.

**मॅट्रियोना:**—रूबल द्यायला मात्र विसरूं नको! मी तो त्या म्हाताऱ्याला नेऊन द्यायचं कबूल केलं आहे.

**अनीशा:**—ठीक! (आपल्या पेटीकडे जाते आणि त्या पुड्या झांकून ठेवते.)

**मॅट्रियोना:**—अन् आतां हें पहा बाळ! त्या पुड्या इतक्या जपून ठेव कीं, त्या कोणालाहि सांपडतां उपयोगाच्या नाहींत. पुढें काय व्हायचं तें होईल, देव भलं करो! पण जर कोणाच्या हें लक्ष्यांत आलं तर त्या झुरळांच्याकरितां आणलेल्या आहेत असं सांग. (रूबल घेते.) झुरळांच्या करितांहि या औषधाचा उपयोग होतो. (बोलतां बोलतां मध्येंच थांबते)

[ अकीम प्रवेश करतो. येशूच्या मूर्तीपुढें उभा राहून क्रॉसचें चिन्ह करतो, त्याच्यामागून पीटर येतो व खालीं बसतो. ]

**पीटर:**—बरं तर मग कसं काय करायचं अकीमदादा!

**अकीम:**—जसं सोइस्कर होईल तसं करावं. कारण असं, या पोरांचे चाळे तुम्ही जाणतांच. त्याला नीट वळण तर लागलें पाहिजेच ना!

**पीटर:**—ठीक ठीक, खालीं बसा तरी, आपण त्यासंबंधानें आतां बोलूंच. (अकीम खालीं बसतो.) बरं मग, काय भानगड आहे? तुम्ही त्याचं लग्न करणार आहां?

**मॅट्रियोना**:--लग्नासंबंधानेंच बोलायचें तर त्याला कांहीं दिवस वाट पहावी लागेल. पीटर इग्नेटिश, आम्ही गरीब आहों. लग्न करायचं पण कशाच्या आधारावर करायचं? आमचीच सध्यां खाण्याची भ्रांत आहे. तो कसा लग्न करूं शकणार?

**पीटरः**—कोणती गोष्ट अधिक हिताची याचा विचार केलाच पाहिजे.

**मॅट्रियोना**:--लग्न करण्याची त्याला तरी येवढी कसली घाई आली आहे! लग्न म्हणजे कांहीं पिकलेला आंबा नव्हे की, तो वेळेवर तोडून घेतला नाहीं तर खालीं गळून पडेल.

**पीटर**:--जर त्याचें लग्न झालें तर एका दृष्टीनें तें बरेंच आहे.

**अकीम**:--आमचंहि तसंच मत आहे—हां! काय म्हणत होतों? शहरामध्यें आम्हीं त्याला एक चांगली नोकरी पाहिली आहे

**मॅट्रियोना**:--हां! फार चांगली नोकरी! गटारें साफ करायचीच कीं नाहीं? परवां जेव्हा हे परत घरीं आले, त्या वेळीं मला ओकतां ओकतां पुरेवाट झाली. फूः फूः!

**अकीम**:--बरोबर आहे. पहिल्या पहिल्यांदां असें व्हायचेंच! काय घाणच ना? परंतु एकदां संवय झाली म्हणजे कांहींच वाटत नाहीं. नोकरी चांगली आहे. खूप पैसे मिळतात. बरं घाणीसंबंधानं म्हटलं तर आमच्यासारख्यांनीं तक्रार करण्याचं कांहींच कारण नाही. कपडे बदलले म्हणजे झालं. म्हणून त्याला, काय त्याचं नांव? निकिटा, त्याला आम्हीं घरीं न्यायचें ठरविलें आहे. त्यानं घर सांभाळावं, समजलं? आणि मीं शहरांत जाऊन थोडें काम करून पैसे मिळवावे.

**पीटर**:--तुम्ही आपल्या मुलाला आपल्या घरीं ठेवणार आहांत? हो! तेंहि एका दृष्टीनें खरेंच. परंतु त्यानें आगाऊ पैसे घेतले आहेत त्याचं काय?

**अकीम**:--कळलं, कळलं! तुमचं म्हणणंच खरं आहे, इग्नॅटिश्. एकदां नोकरींत शिरलं म्हणजे आपल्याला विकून टाकल्यासारखंच आहे नाहीं का? पण तेंहि एका अर्थी खरं आहे! मला वाटतं त्यानं येथें आपली नोकरीची मुदत संपेपर्यंत रहावं. फक्त त्यानं लग्न करून घेतलं पाहिजे, असं माझं म्हणणं आहे. कांहीं दिवस त्याला रजा द्या म्हणजे झालं.

**पीटर**:--हां ! तशी सवड काढतां येईल.

**मॅट्रियोना**:--होय. परंतु अद्यापि आमचेंच नक्की ठरलेलें नाहीं पीटर इग्नॅटिश्, मी यासंबंधानें देवासमोर जसं बोलावं तसं तुमच्यासमोर बोलेन. माझं म्हणणं आणि यांचं म्हणणं यांत रास्त कुणाचं हें तुम्हीच ठरवा. सारखं ' लग्न, लग्न ' असा यांनीं ध्यासच घेतला आहे. परंतु त्याचं लग्न कोणाशीं करायचं आहे, हें तरी विचारालं कीं नाहीं ? यानं जी मुलगी ठरविली आहे, तिच्याशीं लग्न करायचं असेल तर मला मुळींच आवडायचं नाही. असं करून मी माझ्या मुलाची वैरीण बनण्यास तयार नाहीं. ती कारटी कांहीं तशी इमानी नाहीं.

**अकीम**:--नाहीं. ही गोष्ट अगदी गैरशिस्त आहे ! गैरशिस्त आहे ! कारण असं—माझ्या पोरानं त्या मुलीचं नुकसान केलं आहे. खरोखरच त्यानं तिचा गुन्हा केला आहे. समजलं का ?

**पीटर**:--गुन्हा कसा काय केला बुवा ?

**अकीम**:--कसा काय म्हणे ! ती त्याच्याबरोबर--माझ्या मुलाबरोबर--निकिटाबरोबर—तुम्हांला काय सांगायचं म्हणा !

**मॅट्रियोना**:--थोडं थांबाना ! असं कांहीं अगदीं बोलायला नको. मला ठाऊक आहे काय झालं तें. तुमच्याकडे येण्यापूर्वीं आमचा मुलगा रेल्वेंत नोकर होता. तिथं असतांना एका मुलीनं त्याचा पिच्छा पुरविला. ती पोर मोठी कुलीन किंवा थोरामोठ्याच्या घरांतली होती, अशांतला भाग नाही. तिचं नांव मरीना. तिथल्या मंडळींनीं तिला स्वैंपाकाकरितां ठेवलें होतें. आतां ही मुलगी निकिटावर आळ घेत आहे व आपल्याला त्यानं फसवलं असा कांगावा करीत आहे.

**पीटर**:--होय, असं करणं कोणत्याहि दृष्टीनं ठीक नाहीं,

**मॅट्रियोना**:--पण ती पोरटी स्वतः तरी कुठं इतकी प्रामाणिक आहे ! एकाद्या बाजारबसवीप्रमाणं ती सारखी पोरांच्या मागं धांवत असते.

**अकीम**:--ए म्हातारे, तूं आपल्या वळणावर गेलीस ! तूं म्हणतेस तें कांहीं खरें नाहीं, मुळींच खरें नाहीं. समजलं कां, मी काय म्हणतों तें—!

मॅट्रियोना:—पाहिलं, आमच्या ह्या म्हाताऱ्या घुबडाचं काय म्हणणं आहे तें कुणाला समजायचं नाहीं. 'समजलं का, समजलं का?' आपण काय म्हणतों, हें त्याचं त्यालाच समजत नाहीं. पीटर इग्नॅटिश, तुम्ही माझ्या बोलण्यावर हवा तर विश्वास ठेवूं नका. दुसऱ्या कुणालाहि विचारा. प्रत्येक इसमाचें मत माझ्यासारखेंच आहे, असें तुम्हांला दिसून येईल. ही एक पोरकी व अगदीं कुचकामाची मुलगी आहे.

पीटर:—समजलं. अकीमदादा, खरोखरच जर अशी स्थिति असेल, तर त्यानं तिच्याशीं लग्न करण्याचं कांहीं कारण दिसत नाही. सून म्हणजे कांहीं पायपोस नव्हे, कीं तो केव्हांहि फेंकून द्यावा.

अकीम:—(रागारागानें) अगदीं खोटं म्हातारे, तूं म्हणतेस तें अगदीं खोटं आहे. ती मुलगी फार सालस आहे. फारच सालस मुलगी आहे. समजलं ? त्या पोरीबद्दल मला फार फार वाईट वाटतं.

मॅट्रियोना:—घरांत पोरंबाळं भुकेनं मरताहेत अन् जगाचें कल्याण करायला निघाले ! यांना त्या पोरीबद्दल कळकळ वाटते आणि आपल्या स्वतःच्या मुलाबद्दल कांहीं वाटत नाहीं. तिला आपल्या गळयांत बांधून घ्या अन् हिंडा. असल्या लोकांशीं बोलून तरी काय फायदा ? या पोकळ ढोलण्याचा उपयोग काय ?

अकीम:—नाहीं. तें पोकळ नाहीं.

मॅट्रियोना:—पुरें झालं. मला काय बोलायचं तें बोलूं तर द्या.

अकीम:—नाहीं, पोकळ नाहीं. तूं कोणत्याहि गोष्टीला आपल्याला वाटेल तसं वळण देतेस. त्या मुलीसंबंधानं किंवा आपल्यासंबंधानंहि असाच कांहीं तरी विचार तूं करीत असतेस. तुम्ही सर्व लोक तुम्हांला बरं वाटेल त्याप्रमाणें सर्व गोष्टींचा विचार करतां. परंतु परमेश्वर—काय समजलं, तो आपल्या इच्छेप्रमाणें सर्व चक्रें फिरवीत असतो. आहे हें असं आहे.

मॅट्रियोना:—शर्थ झाली बाई ! तुमच्याबरोबर बोलावं कुणीं ! उगीच जिभेला मात्र शीण !

अकीम:—ती मुलगी कष्टाळू व हुशार आहे. सर्व कांहीं जिथल्या तिथं ठेवणारी व सर्वांना हवी वाटणारी अशी ती मुलगी आहे.—काय म्हटलं !

आपण दरिद्री माणसं ! आपले काम करणारे दोन हात आणखी वाढले तर तें चांगलंच ! शिवाय लग्नालाहि फारसा खर्च यावयाचा नाही. पण सर्वांत महत्त्वाची गोष्ट म्हणजे तिच्या बाबतींत आपण गुन्हा केला आहे, त्या मुलीच्या बाबतींत आपल्याकडून गुन्हा झाला आहे. काय म्हणतां ती पोरकी आहे, नव्हे कां, मग तर आम्हीं अधिकच गुन्हा केला आहे.

**मॅट्रियोना**:—बाई, बाई, हे लोक अशाच प्रकारच्या गोष्टी सांगत राहतील.

**अनीशा**:—अकीमदादा, आमचं बायकांचं थोडं ऐकाल कां नाही ? आम्हांला चांगलं वाईट थोडं तरी समजतं. अन् आम्हीहि एक दोन गोष्टी तुम्हांला सांगू शकतों

**अकीम**:—आणि ईश्वर, ईश्वरहि आपल्याला कांहीं सांगतो त्याचं काय ? ती मुलगीसुद्धां माणूसच आहे. काय समजलं, तीहि ईश्वराचं एक लेकरूच आहे. कां तुमचं काय म्हणणं ?

**मॅट्रियोना**:– झाली, ........ पुन्हां सुरवात झाली ! ........

**पीटर**:—अकीमदादा, थोडं दमानें घ्याना ! या मुली जें काय सांगतात त्या सगळ्याच गोष्टींवर कोणाचा विश्वास बसायचा नाहीं. मुलगा तर इथंच आहे, अन् फार लांबहि नाहीं. त्याला बोलवायला पाठवा, अन् खरं काय तें त्याच्याकडूनच समजून घ्याना ! आपला अधःपात व्हावा, अशी त्याचीहि इच्छा नसणार ! जा, अन् त्या पोराला बोलवा (अनीशा उठते.) त्याचा बाप त्याला बोलावतो आहे असं त्याला सांगा. ( अनीशा जाते. )

**मॅट्रियोना**.—अगदीं बरोबर, तुम्हीं अगदीं चांगला मार्ग शोधून काढलांत ! होय, या बाबतींत मुलालाच काय बोलायचं तें बोलूं दे. तुम्हांला माहीतच आहे की जबरदस्तीनं मुलांचीं लग्न लावून देण्याचे दिवस आतां राहिलेले नाहींत. सर्वांच्या अगोदर मुलालाच काय तें विचारलें पाहिजे. तिच्याशीं लग्न करायला तो केव्हांच तयार होणार नाहीं व आपली नाचक्की करून घेणार नाहीं. कांहीं झालं तरी तो असं करणार नाहीं. मला तर असं वाटतं कीं, त्यानं तुमच्या घरींच रहावं. तुम्हांला धनी समजून तुमची नोकरी करीत रहावं. अन् उन्हाळ्याकरितांहि त्याला आम्ही घरी नेण्याच्या

भानगडीत पडूं नये. आम्हांला मदत लागली तर ती मोलानें घेतां येईल. तुम्ही आम्हांला दहा रूबल दिले तर त्याला आम्ही इथंच ठेवून देऊं.

**पीटर**:—बरं, तें सगळं वेळेवर ठरवितां येईल. अगोदर आपण एका गोष्टीचा निकाल लावू, मग पुढें दुसऱ्या सबंधानें विचार करूं.

**अकीम**:—पाहिलेंत पीटर, माझं म्हणण ऐकून घ्या. आलं लक्ष्यांत, पहा, सगळ्या गोष्टी कशा घडून येतात! आपण सर्व आपल्याला जसं सोइस्कर वाटेल तसें ठरवीत असतों. अन् ईश्वराला, काय समजलं ? ईश्वराला आम्ही विसरून जातों. सर्व गोष्टी आपल्या मनाप्रमाणेंच जुळून याव्या, असें आम्हांला वाटतें. अन् तसं झालं नाही म्हणजे आपण अडचणींत सांपडतों. सर्व कांही चांगलं जुळून येईल असं आम्हांला वाटत असतं, अन् तस काही शेवटीं होत नाहीं. ईश्वराला विसरलं म्हणजे असंच व्हायचं, समजलं, मी काय म्हणतों तें?

**पीटर**:—अर्थात् ईश्वराला कोणीहि विसरता कामा नये.

**अकीम**:—त्याचा परिणाम चांगला होत नाही. परंतु आम्ही जेव्हां न्यायानें वागतों—देवाच्या इच्छेप्रमाणें वागतों—त्यामुळे, काय समजलं! प्रत्येकाला आनंदच होतो; तसं वागणं सर्वांना सुखदायकच असत म्हणून माझं म्हणणं असं कीं, मुलाचं लग्न लावून द्यावं, तो पापाचरणापासून अलिप्त राहील असं करावं हेंच रास्त आहे. त्याला कांहीं दिवस घरीं ठेवावं आणि मी शहरांत जाऊन त्याच्याकरितां कांहीं रोजगार पहावा, हेंच रास्त आहे. मी ज्या कामासंबंधानं बोललों तेंच काम योग्य आहे. त्यांत चांगले पैसेहि मिळतील आणि ईश्वराच्या दृष्टीनें तें काम उत्तमहि आहे. ती मुलगी तर अनाथच आहे ना? नाहीं तर इथलेंच उदाहरण पहाना! एक वर्षापूर्वी इथल्या कांहीं मंडळींनीं जमीनदाराच्या मुखत्यारापासून कांहीं सागवान घेतले व त्याला फसविण्याचें ठरविलें. होय, पुढें त्याला त्यांनीं फसविलेंहि. ते मुखत्याराला फसवूं शकले म्हणून ते ईश्वराला फसवूं शकणार नाहींत. बरं—हें असं आहे........"

[ निकिटा आणि नानी प्रवेश करतात. ]

**निकिटा**:—तुम्हीं मला बोलावलं ? ( खालीं बसतो व तंबाखूची चची बाहेर काढतो.)

पीटरः--(हलक्या पण रागाच्या स्वरांत) कां कसला विचार करतोस ? कांहीं रीतभात आहे कीं नाही ? तुझ्या वडिलांना तुजबरोबर कांही बोलावयाचं आहे. आणि तूं तर तिथं खालीं बसलास व तंबाखू चघळावयास लागलास. चल, ऊठ इकडे ये.

[ निकिटा उठतो. निष्काळजीपणानें टेबलावर कोंपरें ठेवून उभा राहतो आणि हंसतो. ]

**अकीम:**—तुझ्या विरुद्ध लोकांची तक्रार आहे निकिटा ! तक्रार आहे समजलास, तक्रार आहे !

**निकिटा**—काय, कोणाची तक्रार आहे ?

**अकीम:**—कोणाची ? एका अनाथ मुलीची तक्रार आहे समजलास ! ती मुलगी तुला ठाऊकच आहे, मरीना. हां, मरीनाची तुझ्या विरुद्ध तक्रार आहे.

**निकिटा:**—( हंसतो ) वा: फारच छान ! काय, काय तक्रार आहे ? ती तुमच्याजवळ कोणीं केली ? खुद्द तिनं केली ?

**अकीमः**--मी तुला विचारतों त्याचें उत्तर दे. त्या पोरीशीं तुझा संबंध आला कीं नाही ? काय समजलं, संबंध आला कीं नाहीं ?

**निकिटा:**—तुम्ही काय म्हणतां तें मला समजतच नाहीं. काय आहे काय ?

**अकीम:**—त्या पोरीबरोबर तू थेडेचार केलेस की नाहीं ?

**निकिटा:**—काय केलं तें केलं, त्यांत इतकें लक्ष्य घालण्याचं काय कारण ? स्वयंपाकिणीबरोबर आपला वेळ घालविण्याकरितां अर्थात् कोणी कांही गंमती करतोच. कधीं कधी पेटी वाजवून कोणीहि तिला नाचावयास सांगतो. मग त्यांत झालं काय मोठं ?

**पीटर:**—उगीच अशी टाळाटाळी करूं नकोस. निकिटा ! तुझा बाप तुला काय विचारतोय त्याची नीट उत्तरें दे.

**अकीम:**—( गंभीरपणानें ) तूं मनुष्यापासून कांहीं गोष्टी लपवून ठेवूं शकशील पण ईश्वरापासून त्या लपवून ठेवूं शकणार नाहींस. निकिटा! असं खोटं बोलूं नकोस. ती पोर अनाथ आहे तेव्हां तिचा कोणींहि अपमान करावा—ती पोर अनाथ आहे हें तुला ठाऊकच आहे. मग काय काय झालं तें खरं खरं सांगेनास !

**निकिटा**:--पण सांगावयाजोगं कांहीं नसलंच तर ! काय सांगूं तरी काय ? मला काय सांगायचं होतं तें सांगितलेंच आहे. ( आवेशानें ) ती कोठेंहि जाईल आणि माझ्या संबंधानें कांहींहि सांगेल. माझ्यासंबंधीं ती तक्रार करते मग फेक्का निकिशीनसंबंधानें तिनं कां तक्रार करूं नये ? शिवाय एकाद्यानें कांहीं थोडीशी गंमत केली, तर त्यांत काय मोठंसं बिघडलं ? आणि ती तर काय मोकळीच आहे. कोणाला काय पाहिजे तें सांगेल !

**अकीम**:--निकिटा ! लक्ष्यांत ठेव, खोटं कधीं झांकून रहात नाहीं. तें केव्हां तरी बाहेर पडतंच. खरोखरी कांहीं झालं कां ?

**निकिटा**:—( स्वगत ) आपलं कसं तें सोडीत नाहीं हेंच तर फार वाईट. ( अकीमला उद्देशून ) मी स्पष्ट सांगतों मला यापेक्षां जास्त कांहीं माहीत नाहीं. आम्हां दोघांत कांही घडून आलें नाहीं. (रागानें ) मला यांतलें कांहीं माहीत असलें तर देव मला शासन करील. ( क्रॉसची खूण करतो. थोडा वेळ थांबून आणखी अधिक रागानें ) काय, तुम्ही तिच्याशीं माझें लग्न लावून देण्याचा विचार चालविला आहे ? काय याचा अर्थ तरी काय ?—ही तर अगदीं लाजिरवाणी गोष्ट आहे. शिवाय एकाद्याचें जबर-दस्तीनें लग्न लावून देण्याचे दिवस आतां राहिलेले नाहींत. माझं म्हणणं काय तें स्पष्टपणें मीं सांगितलें आहे. मला या गोष्टीबद्दल कांहीं माहिती नाहीं, हें मी शपथेवर नाहीं कां सांगितलें ?

**मॅट्रियोना**:—( आपल्या नवऱ्याला उद्देशून ) शर्थ झाली बाई ! कुणी कांहीहि सांगावं अन् त्याच्यावर विश्वास ठेवावा, हें आहे काय ? सांगणाराचें काय, तो मोकळाच. पण पोराला मात्र लज्जेनें खालीं मान घालावी लागते. यांतून सुटण्याचा उत्तम मार्ग म्हणजे त्यानें सध्यां आहे तिथंच आपल्या धन्यापाशीं रहावं, त्याचा धनी आजची आपली गरज भागवील. १० रूबल तो आपणांला देईल व आपणहि वेळेवर त्याचे पैसे....

**पीटर**:—बरं, अकीमदादा, मग काय करायचं ?

**अकीम**:—(आपल्या मुलाकडे पाहतो व नापसंतीदर्शक स्वरांत बोलूं लागतो.) लक्ष्यांत ठेव निकिटा, लक्ष्यांत ठेव. ज्याच्यावर अन्याय झाला

आहे त्याचे अश्रू इकडं तिकडं कुठं पडत नाहींत, तर ज्यानं तो अन्याय केलेला असतो त्याच्या डोक्यावरच पडतात. लक्ष्यांत ठेव.

**निकिटा**:—( खालीं बसतो. ) यांत लक्ष्यांत काय ठेवायचं आहे? जें काय लक्ष्यांत ठेवायचं असेल तें तुम्हींच ठेवा.

**नानी**:- ( स्वगत ) आतांच्या आतां धांवून आईला हें सांगितलं पाहिजे. ( जाते. )

**मॅट्रियोना**:—( पीटरला उद्देशून ) माझ्या या म्हाताऱ्याचं असंच. पीटर इग्नॅटिश, याच्या टकोरींत एकदां कांहीं शिरलं कीं, तें कधींहि बाहेर पडायचं नाहीं. आम्हीं तुम्हांला इथं येऊन उगाच त्रास दिला. आमचा मुलगा पूर्वीप्रमाणेंच तुमच्याकडे राहील. आपला नोकर म्हणून तुम्ही त्याला आपल्यापाशीं ठेवा.

**पीटर**:—बरं, अकीमदादा, तुमचं काय म्हणणं?

**अकीम**:—काय, तो पोरगा स्वतः मुखत्यारच आहे. जर त्याला माझं ऐकायचं असेल ......तर माझं म्हणणं मीं त्याला सांगितलं आहे........काय समजलं?

**मॅट्रियोना**:—तुम्ही काय म्हणतां, हें तुमचं तुम्हांलाच समजेनासं झालं आहे. खुद्द आपल्या मुलालाच ही नोकरी सोडायची नाहीं. शिवाय त्याला घरीं नेऊन तरी काय करायचंय? त्याच्याशिवाय आम्ही कसं तरी भागवून घेऊं!

**पीटर**:- अकीमदादा, एकच गोष्ट सांगायची म्हणजे तुम्ही त्याला जर आतां उन्हाळ्यांत परत घेऊन जाणार असाल, तर हिंवाळ्याकरितां तो आम्हांला इथं नको आहे. जर त्याला इथं रहायचं असेल तर त्यानं इथं वर्षभर रहायला पाहिजे.

**मॅट्रियोना**:--होय, एक वर्षाच्या करारानें तो इथं राहील. कामाचा रगाडा सुरू झाला अन् आम्हांला कोणाची मदत लागली, तर ती आम्ही मोलानं घेऊ. आमचा मुलगा तुमच्याकडे राहूंदेच. फक्त आतां आम्हांला दहा रूबल द्या, म्हणजे झालं.

**पीटर**:—बरं, ठीक आहे. मग काय तो आणखी एक वर्ष राहणार?

**अकीम**:—( सुस्कारे टाकीत ) ठीक आहे, जें जें व्हायचं असेल तें झालंच पाहिजे.

**मॅट्रियोना**:—होय, पुढील वर्षभर. सेंट मिट्रीच्या दिवसापासून वर्ष मोजायचं. तुम्ही त्याला चांगली मजुरी द्याल, हें आम्हांला माहीत आहे. पण आतां आम्हांला दहा रुबल द्या. आमच्या अडचणीच्या वेळी मदत करा. ( उठते व पीटरला नमस्कार करते.)

[ नानी व अनीशा प्रवेश करतात. अनीशा कोंचावर एका बाजूला बसते ]

**पीटर**:—बरं तर ठरलंना ! मग चला आपण त्या पलीकडल्या हॉटेलांत जाऊं. चला अकीमदादा, व्होडकाचा एक प्याला घ्यायला कांहीं हरकत नाहींना ?

**अकीम**:—नाहीं, मी तसलं पेय कधीहि पीत नाहीं.

**पीटर**:—बरं, तर चहा तर घ्याल ?

**अकीम**:—हां, चहा होय, तेवढं पाप मी करतों. होय, चहाला कांहीं हरकत नाहीं.

**पीटर**:—आणि या बायकाहि चहा घेतील. चला, अन् हें बघ, निकिटा, तूं त्या मेंढ्या आंत हांकून घेऊन ये व गवत वगैरे काढून जागा साफ करून ठेव.

[ निकिटाशिवाय सगळें बाहेर जातात. निकिटा सिगारेट शिलगावतो. अंधार पडूं लागतो. ]

**निकिटा**:—पहा, कसे लोक आहेत. एकाद्याच्या मागें लागले म्हणजे त्याचा पिच्छा पुरवतात. मुलींच्या मागें आम्ही कसे घुटमळत असतों हें यांना सांगायला पाहिजे ! हें सांगायचं म्हणजे यांना एक रामायणच सांगायला पाहिजे ! म्हणे, तिच्याबरोबर लग्न करा ! मग सगळया मुलीं-बरोबरच लग्न करावयास पाहिजे ! मग काय एकाद्याच्या मागें बायकांचें लेंढारच लागायचं ! आणि मला लग्न करावयाची जरूरी तरी काय ! आतां माझं जवळ जवळ लग्न झाल्यासारखंच आहे ! माझी ही मजा पाहून बरीच मंडळी माझा हेवा करतात. तथापि देवापुढं उभा राहून मीं जेव्हां क्रॉसचें चिन्ह केलें व शपथ घेतली, त्या वेळीं मात्र मला किती चमत्कारिक

वाटलं ! मला कोणी आंतून धक्काच देत आहे असा भास झाला. सगळा व्यूह कसा एकदम ढांसळून पडला. जें मुळांतच खरं नाहीं तें शपथेवर खरें आहे म्हणून सांगायचें हें भयंकर आहे, असें म्हणतात. पण त्यांत कांहींच अर्थ नाहीं. ही सर्व केवळ थापेबाजी आहे. शपथ घेतली म्हणून झालें काय ? ती तर अगदीं साधी गोष्ट आहे.

**अकुलिना:**—(अकुलिना हातांत दोरी घेऊन प्रवेश करते दोरी खालीं टाकते. कामावर जातांना लागणाऱ्या जिनसा घेते व गोठ्यांत शिरते.) अरे ! निदान दिवा तरी लावावयाचा होता !

**निकिटा:**—काय तुझा मुखडा पाहण्याकरितां ? पण तुला निरखून पहायला कांहीं दिवा नको आहे !

**अकुलिना:**—अं ! तूं कां ? जा मेल्या !

[ नानी प्रवेश करते आणि निकिटाजवळ कांहीं पुटपुटते. ]

**नानी:**—निकिटा, तुला भेटण्याकरितां कोणी तरी आलं आहे.

**निकिटा:**—कोण आलं आहे ?

**नानी:**—ती रेल्वेवरची मरीना ! ती बाहेर तेथें कोंपऱ्यावर उभी आहे.

**निकिटा:**—ही कुठून ब्याद आली !

**नानी:**—होय, मरीनाच आली आहे.

**निकिटा:**—ती आली आहे तरी कशाकरितां ?

**नानी:**—ती तुला बाहेर बोलावीत आहे. निकिटाबरोबर मला दोन शब्द बोलावयाचे आहेत, असें ती म्हणते. मीं तिला विचारून पाहिलें पण ती कांहींच सांगत नाहीं. "तुम्हांला तो सोडून जात आहे हें खरं आहे कां ?" येवढंच मला तिनें विचारलें. अन् मी म्हटलं "नाहीं. त्याला घेऊन जायचं आणि त्याचं लग्न करून द्यायचं असं बापाच्या मनांत होतं. पण त्याची तशी इच्छा नाहीं. तो आमच्या घरींच आणखी एक वर्ष राहणार आहे." ती पुन्हां म्हणाली, "कसंहि कर आणि त्याला माझ्याकडे पाठवून दे. मला त्याच्याबरोबर बोललंच पाहिजे." ती किती तरी वेळ बाहेर वाट पहात उभी आहे. तूं जात कां नाहींस ?

**निकिटा**:--मरूं दे तिला! तिच्याकडे जाऊन करायचंय काय?

**नानी**:—"तो जर येणार नाहीं तर मीच आंत झोंपडींत येईन" असें ती म्हणते. खरोखरंच ती असं म्हणाली!

**निकिटा**:—ती कसली आंत येते! ती बाहेर थोडा वेळ वाट पाहील व मग निघून जाईल.

**नानी**:--"अकुलिनाशीं तुझं लग्न करून देणार आहेत हें खरं आहे कां?" असें तिनें मला विचारलें.

[ अकुलिना परत प्रवेश करते. चरखा फिरविण्याचा दांडा आणण्याकरितां निकिटाजवळून जाते.]

**अकुलिना**:--अकुलिनाशीं कोणाचं लग्न लावायचं?

**नानी**:--कां बरं, निकिटाचं!

**अकुलिना**:--असेल कदाचित्! पण असं कोण म्हणत होतं?

**निकिटा**:--( तिच्याकडे पाहतो व हंसतो ) लोक असं बोलतात खरं! अकुलिना, तूं माझ्याशीं लग्न करशील?

**अकुलिना**:—काय तुझ्याशीं? कदाचित् यापूर्वी मीं केलं असतं पण आतां मी नाहीं करणार!

**निकिटा**:--कां, आतां कां नाहीं?

**अकुलिना**:--कारण तूं माझ्यावर प्रेम करणार नाहींस.

**निकिटा**:--कां बरं नाहीं?

**अकुलिना**:—तुला तसं ती करूं देणार नाहीं. (हंसते.)

**निकिटा**:--कोण करूं देणार नाहीं?

**अकुलिना**:--कोण? माझी सावत्र आई! ती सारखी कुरकुरत असते व तुझ्याकडे पहात असते.

**निकिटा**:—(हंसत हंसत) पहा ऐकून घ्या! तूं तर मोठी बिलंदरच आहेस!

**अकुलिना**:--कोण? मी? मला काय दिसत नाहीं? ती दादांच्यावर सारखी वसवस करीत असते. चवचाल अवदसा कुठली! ( खोलींत जाते.)

**नानी:**—(खिडकीकडे पहात) पहा, निकिटा ती इकडेच येत आहे. ती खात्रीनं तुझ्याकडेच येत आहे. मी आपली जातें. ( बाहेर जाते.)

**मरीना:**—(प्रवेश करते.) तूं काय आरंभलयंस तरी काय ? माझी काय दशा होणार ?

**निकिटा:**—मी काय आरंभलंय ? कांहींच नाहीं.

**मरीना:**—तूं मला देशोधडीला लावणार ?

**निकिटा:**—(रागारागानें उठतो.) हें आहे काय ? तूं इथं कां आलीस ?

**मरीना:**—काय, निकिटा !

**निकिटा:**—तूं तर विचित्रच आहेस. तूं इथं काय म्हणून आलीस !

**मरीना:**—निकिटा !

**निकिटा:**—होय, माझं नांव निकिटा आहे. तुला या निकिटाशीं काय कर्तव्य आहे ? काय, विचार कसला करतेस ? जा, इथून चालती हो ! तुला मी काय सांगतों समजत नाहीं ?

**मरीना:**—मला समजतें. मला वाऱ्यावर सोडून द्यावयाची, असाच तुझा विचार ना !

**निकिटा:**—बरं, तुझा माझा आतां काय संबंध राहिला आहे ? तुझं तुलाच समजत नाहीं ? तूं तिथं त्या कोंपऱ्यावर उभी होतीस तेथून नानीबरोबर माझ्याकडे निरोप पाठविलास. अन् मी आलों नाहीं, येवढ्यावरून तुझी मला गरज नाहीं हें स्पष्ट झालं नाहीं कां ? ही तर अगदीं साधी गोष्ट आहे ! मग आतां जा, इथून चालती हो !

**मरीना:**—म्हणे गरज नाहीं ! अन् आतां मी तुला नकोशी झाल्यें अं ! मी तुझ्यावर प्रेम करीन असं तूं म्हणालास त्या वेळीं तुझ्या शब्दावर मीं विश्वास ठेवला. अन् आतां माझा घात केल्यावर मी तुला नकोशी झाल्यें !

**निकिटा:**—उगाच बडबड करण्यांत काय अर्थ आहे ? तूं बाबांना नाहीं नाहीं त्या गोष्टी सांगितल्यास, नाहीं कां ? आतां तूं जातेस कां नाहीं ? का इथून हालतेस कां नाहीं ?

**मरीना**:--तुझ्याशिवाय दुसऱ्या कोणावरहि माझें प्रेम नाहीं, हें तुला माहीत आहे. तूं माझ्याबरोबर लग्न कर किंवा नको करूं, मी तुझ्यावर कधी रागावलें नसतें. पण मीं तुझें कांहींच नुकसान केलेलें नाही. असं असतांना माझ्याबद्दल तूं पर्वा देखील बाळगूं नये अं ! हें असं काय म्हणून ?

**निकिटा**:—चंद्राकडे पाहून त्याच्यावर भुंकत राहण्यांत फायदा काय ? तूं चल चालती हो ! किती मठ्ठ आहेस ?

**मरीना**:—माझ्याशीं लग्न करायचं वचन दिलंस व मला फसवलंस याबद्दल मला वाईट वाटत नाही, परंतु माझ्यावर प्रेम करायचं तूं सोडून दिलंस याबद्दलच मला दुःख वाटत आहे. नाहीं, असेंहि नाही. तूं माझ्यावर प्रेम करीनासा झालास याबद्दलहि मला दुःख वाटत नाहीं परंतु तूं माझ्याजागीं दुसरीला आणून बसवलीस याचेंच मला वाईट वाटत आहे. ती कोण आहे, हें मला माहीत आहे.

**निकिटा**:--( तिच्याकडे त्वेषानें येतो.) अक्कल कशाशी खातात हें तुला माहीतच नाहीं; तेव्हां तुझ्यासारखीशीं बोलत राहून फायदा काय ? तूं पुकाट्यानें ऐकायची नाहींस. चालती हो. मला कांहीं तरी करायला लावूं नकोस. मग तुलाच त्याबद्दल वाईट वाटेल

**मरीना**:—मग काय, तूं मला मारणार ? ठीक आहे मार ना ! कां असा मागें कां फिरतोस ? निकिटा !

**निकिटा**:—समज, इथं कुणी तरी आलं तर कस होईल ? अर्थात् हें अगदी अयोग्य आहे. पण उगाच बोलून काय फायदा ?

**मरीना**:—मग हें इथं संपलंच म्हणायचं जें काय पूर्वी ठरलं होतं त्याचा असा निकाल लागला म्हणायचा. मी तें सर्व विसरून जावं, असंच तुमचं म्हणणं कीं नाहीं ? बरं तर निकिटा ऐक. डोळ्यांतील बाहुलीप्रमाणं मीं आपल्या कौमार्याचं रक्षण केलं होतं, पण तूं माझा निष्कारण सत्यानाश केलास. तूं माझा घात केलास. आईबाप नसलेल्या माझ्यासारख्या मुलीबद्दल तुला कींव कशी ती वाटत नाहीं ना ? ( रडूं लागते.) तू मला देशोधडीला लावलीस--तू माझा घात केलास ! पण तुझ्याबद्दल मला यत्किंचितहि मत्सर

वाटणार नाहीं. देव तुला क्षमा करो. जर तुला एकादी चांगली बायको मिळाली तर तूं मला विसरून जाशील. नाही, तशी मिळाली नाहीं तर मात्र माझी तूं आठवण काढशील. निकिटा! नमस्कार. शेवटीं हें असच व्हायचं होतं म्हणायचं ! हा ! हा ! माझं तुझ्यावर किती तरी प्रेम होतं. माझा हा शेवटचाच निरोप आहे. (आपल्या हातांत त्याचें डोकं धरते व त्याचें चुंबन घेऊं पाहते.)

**निकिटा:**--(आपलें डोकें झटकन् मागें घेत) तुझ्याबरोबर मी बोलायला तयार नाही. जर तूं इथून जात नसशाल, तर मीच इथून निघून जातों. तुला एकटीला इथं उभ रहायचं असलं तर उभी रहा.

**मरीना:**—( किंकाळी फोडते.) तूं पशू आहेस ! ( दारांत उभी राहून ) ईश्वर तुला सुखी ठेवणार नाही. ( रडत रडत बाहेत जाते )

**अकुलिना:**—( खोलीबाहेर पडते. ) निकिटा, तू गाढव आहेस !

**निकिटा:**—काय, झालं काय ?

**अकुलिना:**—तिनं किती भयंकर किंकाळी फोडली ! ( रडूं लागते. )

**निकिटा:**—तुझ काय बिघडलं ?

**अकुलिना:**--काय बिघडलं ? तिला तूं दुखवलंस तसं मला देखील तूं असंच दुखवशील. तूं शुद्ध गद्धा आहेस.|( घरांत निघून जाते.)

[ स्तब्धता ]

**निकिटा:**--खूब झाली बुवा ! मी सगळ्या पोरींना मधासारखा आवडतो खरा, पण त्यांच्याशीं पापाचरण केलं तर मात्र त्याच्यासारखं कांहींच वाईट नाहीं हें खरं !

[ पडदा ]

**अंक पहिला समाप्त**

---

# अंक दुसरा

[गांवांतील रस्ता. रस्त्याच्या डाव्या बाजूला पीटरच्या लांकडाच्या ठोकळ्यांनीं बांधलेल्या झोंपडीची बाहेरची बाजू. झोंपडीच्या उजव्या बाजूला परसूं. त्याचीं काष्टकें व त्यांतील खोपटें. परसाच्या कोंपऱ्यावर, रस्त्यावर अनीशा तागाची झोडपणी करीत असते. पहिल्या अंकांतील हकिकतीनंतर सहा महिन्यांनीं.]

**अनीशाः**--(थांबते व ऐकते.) पुन्हां कांही तरी टुरटुर चाललीच आहे. तो बहुतकरून माळ्यावरून खालीं उतरला आहे वाटतं !

[ अकुलिना प्रवेश करते. दोन्ही हातांत दोन बादल्या घेऊन जात असते. ]

**अनीशाः**--तो हांका मारतोय्. जा, अन् त्याला काय पाहिजे तें पहा. ओरडून ओरडून त्यानं जसं भंडावून सोडलंय्.

**अकुलिनाः**--तूं कां जात नाहींस ?

**अनीशाः**--जा. तुला मी काय सांगतें ! (अकुलिना झोंपडीत जाते.) तो माझ्या जिवावरच उठलाय् पैसे कुठ आहेत याचा थांग लागू देत नाहीं. पैशाभोंवतीं त्याचा जीव घुटमळून राहिला आहे. परवां तो त्या बोळकंडींत शिरला होता. त्यानं तिथं ते पुरून ठेवले असतील. आतां त्यानं पैसे कुठं ठेवले, हें मला तर माहीत नाहीं. इतकंच बरं म्हणायचं कीं, तो पैशाला आपल्या नजरेआड होऊं देत नाहीं. यामुळं ते निदान घरांत तरी राहतील. फक्त त्यानं ते कुठं लपवून ठेवले आहेत, येवढंच पहायला पाहिजे. काल त्याच्याजवळ तर ते नव्हतेच. आतां त्यानं ते कुठं ठेवले, हें समजायला मार्ग नाहीं. त्यानं मला जसं कांहीं हैराण करून सोडलं आहे.

[ अकुलिना प्रवेश करते. तिनं आपल्या डोक्याभोंवतीं टॉवेल गुंडाळून बांधलेला असतो ]

**अनीशाः**—कां, कुठं चाललीस ?

**अकुलिना:**--कुठं ? बाबांनी मला मार्थाकडे जायला सांगितलंय्. " बहिणीला बोलावून घेऊन ये " असं ते म्हणताहेत. " मी मरत आहें. मला तिला कांहीं सांगायचंय " असं ते म्हणाले.

**अनीशा:**—( बाजूला स्वगत) बहिणीला बोलावतो अं ! काय करूं या डोक्याला ? खचित ते पैसे तो तिलाच खात्रीनें देणार आहे. आतां काय करूं ! (अकुलिनास उद्देशून) जायचं नाहीं. कुठं जायचं नाहीं ! कुठं, चाललीस कुठं ?

**अकुलिना:**--कुठं म्हणजे ! आत्याबाईंना बोलवायला.

**अनीशा:**--कांहीं जायचें नाहीं. मी सांगतें ना, मी स्वतःच जाईन. घे. ते कपडे घे व नदीवर जा. नाहीं तर संध्याकाळपर्यंत ते तसेच पडून राहतील.

**अकुलिना:**—पण त्यांनीं मलाच जायला सांगितलंय्.

**अनीशा:**—तूं जा इथून अन् मी काय सांगतें तें कर. मार्थाला मी स्वतःच घेऊन येतें. कुंपणावरील ते शर्ट काढून आण.

**अकुलिना:**—काय शर्ट घेऊन येऊं ? पण तूं कदाचित् जाणार नाहीस. त्यांनीं तसं मला आग्रहानं सांगितलं आहे.

**अनीशा:**—मी जातें आहें, असं मी तुला सांगितलं ना? नानी कुठं आहे ?

**अकुलिना:**—नानी ? ती वांसराच्या मागे गेली आहे.

**अनीशा:**--तिला इकडं पाठीव. ती कांहीं पळून जाणार नाहीं !

(अकुलिना कपडे गोळा करते व बाहेर पडते.)

**अनीशा:**--बरं, कुणी गेलं नाहीं तर तो शिव्या देत बसेल. बरं जावं तर तो आपल्या बहिणीला पैसे देऊन टाकील. माझी इतकी सारी मेहनत फुकट जाईल. मीं काय करावं हेंच मला समजत नाहीं. माझं डोकं तर अगदी भणाणून गेलं आहे. ( काम करूं लागते. )

[ मॅट्रियोना प्रवेश करते. बगलेंत बोचकें घेऊन काठी टेकीत येते. ]

**मॅट्रियोना:**--देव तुझं भलं करो बाळ !

**अनीशाः**--(सभोंवतीं पाहते काम थांबविते व आनंदानें टाळ्या वाजविते.) माझी अगदीं कल्पना नव्हती, तुम्हीं याल अशी ! देवानं अगदीं योग्य वेळेला योग्य मनुष्य पाठविला.

**मॅट्रियोनाः**--बरं, कसं काय चाललंय् ?

**अनीशाः**--अं ! मी तर अगदीं गोंधळून गेलें आहें ! फारच भयंकर प्रसंगांत मी सांपडलें आहें.

**मॅट्रियोनाः**--बरं, तो जिवंत आहे असं मला समजलं

**अनीशाः**--तें कांहीं विचारूं नका. तो जगतहि नाही व मरतहि नाहीं.

**मॅट्रियोनाः**—पण पैशाचं काय ? त्यानं ते दुसऱ्या कोणाला देऊन टाकले ?

**अनीशा**--आतांच तो आपल्या बहिणीला बोलावणं पाठविणार होता-- बहुतेक पैशाकरितांच असेल.

**मॅट्रियोनाः**—अगदीं साहजिक आहे ! पण त्यानं ते दुसऱ्या कुणाला अद्याप दिले नाहीत ना ?

**अनीशा** --कोणाला दिले नाहींत. बहिरी ससाण्याप्रमाणं त्याच्यावर माझी नजर आहे

**मॅट्रियोनाः**--त्यानं ते पैसे ठेवले आहेत कुठं ?

**अनीशा** --तेंच तर त्यानं मला समजूं दिलं नाहीं. कितीहि खटपट केली तरी मला तें समजलं नाहीं. आज इथं तर उद्यां तिथं, असे तो ते लपवून ठेवतो. अन् ही अकुलिना मधें आहेना ! त्यामुळं मला कांहींच करतां येत नाहीं. ही बेडसर असली तरी ही सारखी पाहऱ्यावर असल्यासारखी माझ्या- भोंवतीच घुटमळत असते. माझ्या डोक्यानं कसा अगदीं ताळच सोडला आहे. या वेदना सहन करण्यापेक्षां मेलेलं बरं असं मला वाटूं लागलं आहे.

**मॅट्रियोनाः**—हें बघ बाळ, तुझ्याशिवाय दुसऱ्या कुणाला जर कां तो पैसे देईल तर जन्मभर रडत बसण्याचीच पाळी तुझ्यावर येईल. ते तुला घरांतून हांकून लावतील अन् तुझ्याजवळ एक फुटका मणीहि रहावयाचा नाहीं. ज्याच्यावर तुझें प्रेम नाहीं अशा माणसाजवळ तूं रखडत पडली आहेस, अन् उद्यां विधवा झालीस म्हणजे भीक मागत फिरावें लागेल.

**अनीशा**:--माई, मला हें सर्व कळतं आहे. माझ्या अंत:करणाची कशी कालवाकालव झाली आहे. काय करावं हेंच मला सुचेनासें झालें आहे. कुणाला कांही विचारावं तर तसंहि कुणी इथं नाहीं निकिटाला मी सांगून पाहिल. पण तो तें काम करायला तयार नाही तसं करण्याची त्याला भीति वाटते. तक्तपोशीखाली पैसे पुरून ठेवले आहेत येवढेंच काय तें त्यानें मला सांगितलें.

**मॅट्रियोना**:—बरं, मग तूं त्या ठिकाणीं पाहिलंस कां?

**अनीशा**:—तसं कसं करणार? तो म्हातारा तर खुद्द्च त्या खोलीमध्यें बसून होता. कधी कधीं तो ते पैसे आपल्या जवळहि ठेवतो व कधीं कधीं कुठं पुरूनहि ठेवतो.

**मॅट्रियोना**:—पण हें बघ बाळ, त्यानं एकदां कां झुकांडी दिली कीं, झालं! ती चूक पुन्हां कधी सुधारायची नाहीं. (हलक्या आवाजांत) बर, त्याला तूं तो कडक चहा करून दिलास कां?

**अनीशा**:—हो, हो.........( उत्तर देण्याच्या बेतांत असते पण जवळून जात असलेल्या शेजारणीला पाहून थांबते. )

[ शेजारीणबाई झोंपडीजवळून जाते व आंतून कोणी तरी हांका मारीत असल्याचें ऐकते.]

**शेजारीण**:—( अनीशाला उद्देशून ) काय म्हटलं? ए अनीशा, अनीशा, तुझा तो म्हातारा तुला हांका मारतोय ना!

**अनीशा**:—त्याचा तो खोकला तसाच आहे. लोकांना वाटतं तो जसा कांही किकाळ्याच मारीत आहे. त्याची तब्बेत फारच खालावत चालली आहे.

**शेजारीण**:--( मॅट्रियोनाकडे जाऊन ) कां आजी कसं काय आहे? बऱ्याच लांबून आल्यात म्हणायच्या!

**मॅट्रियोना**:—अगदीं घरून निघालें ती इकडे आलें. मुलाला भेटण्याकरितां आलें आहें. त्याच्याकरितां काहीं शर्ट आणले आहेत. असल्या गोष्टींचा विचार करावाच लागतो. तुम्हांला माहीतच आहे. आपलंच पोर असल्यावर हें सगळं करायलाच पाहिजे.

**शेजारीण:**—होय, हें तर नेहमींचंच आहे. ( अनीशाला उद्देशून ) तागाचें कापड धुऊन टाकण्याचा मीहि विचार करीत होतें. पण मी थोडीशी जलदीच करीत आहें असं मला वाटतं. अद्यापि या कामाला कोणी सुरवात केलेली नाहीं.

**अनीशा:**—इतकी घाई कशाला तर मग?

**मॅट्रियोना:**—बरं, त्याला प्रायश्चित्त वगैरे देण्यांत आलें कां!

**अनीशा:**—होय, काल पाद्री इथं आला होता.

**शेजारीण**—काल मीहि त्याला पाहिलें. काय सांगूं! असल्या स्थितींत त्याचा देह व आत्मा दोन्ही एके ठिकाणी कशीं राहतात, याचंच मला नवल वाटतं. अन् परवां तर, अरे देवा, त्याची अगदीं अखेरची घटका आली होती. मंडळींनीं त्याला मूर्तीखालीं आणून निजविलें होतें.‡ ते सगळे रडूं लागले व त्याला बाहेर काढण्याच्याहि ते विचारांत होते.

**अनीशा:**—पण तो त्या वेळी पुन्हां शुद्धीवर आला. अन् आतां पुन्हां रांगूं लागला आहे.

**मॅट्रियोना:**— बरं, अखेरचं प्रायश्चित्त देण्याची वेळ आली आहे का!

**अनीशा:**—शेजारीपाजारी तसेंच सांगत आहेत. उद्यांपर्यंत जर तो जिवंत राहिला तर पाद्र्यालाहि बोलवायचं मीं ठरवलं आहे.

**शेजारीण:**—अग, अनीशा, तुझं हृदय दुःखान कसं अगदी भरून गेलं असेल नाहीं! प्रत्यक्ष आजारी मनुष्य अंथरुणावर पडून असला तर तें कांहीं इतकं जाचत नाहीं पण जे लोक त्याच्याजवळ बसतात, त्याची शुश्रूषा करतात तेच भयानं गांगरून गेलेले असतात.

**अनीशा:**—होय, एक इकडं किंवा एक तिकडं कांही तरी एक झालं पाहिजेना!

---

‡ मनुष्य मरूं लागला म्हणजे त्याला मूर्तीखालीं आणून निजवावयाची रशियांत चाल आहे. सनातनी रशियन शेतकऱ्यांच्या झोंपड्यांतून एकदोन मूर्ती टाकलेल्या असतातच.

**शेजारीण**:—होय, तूं म्हणतेस तें खरं आहे. वर्ष न वर्ष मरत राहृचचं, म्हणजे कांहीं थट्टा नव्हे. तुझे हातपाय बांधून टाकल्यासारखेच झाले असतील. नाहीं तर काय ?

**मॅट्रियोना**:—हा ! पण विधवेचं जिणं तरी कष्टाचंच नाहीं कां ? तारुण्य आहे तोंपर्यंत ठीक आहे. पण म्हातारं झाल्यावर तुला कोण विचारणार ? होय, म्हातारपण ही सुखाची गोष्ट नाहीं. माझंच पहाना ! मी कांहीं फारशी चालून आलें आहें असं नाहीं तरी माझे पाय इतके दुखून आले आहेत कीं मला उभं देखील राहवत नाहीं. कां, माझा मुलगा कुठं आहे ?

**अनीशा**:—नांगरणी करीत आहे. पण तुम्ही आंत या ना ! आतां आधण तयार होईल. थोडा चहा प्यालांत म्हणजे हुशारी वाटेल.

**मॅट्रियोना**:—(खालीं बसतां बसतां) होय. तें अगदीं खरं. झालं, आमच्या आयुष्याचे दिवस संपत आले. अखेरच्या प्रायश्चित्तासंबंधानं बोलायचं तर तें अत्यंत आवश्यक आहे. शिवाय आत्म्याच्या शांतीच्या दृष्टीनंहि तें घेणें योग्य आहे.

**अनीशा**:—होय, त्याच्याकरितां उद्यां मनुष्य पाठवून देईन.

**मॅट्रियोना**:—होय, तेंच बरं पडेल. अन् आमच्या गांवाजवळ नुकतंच एक लग्न झालं.

**शेजारीण**:—काय ? वसंतऋतूमध्यें अन् लग्न ! *

**मॅट्रियोना**:—होय, जर तो गरीब असता........गरीब माणसानं असं केलं असतं तर ! वेळकाळ कांहीं पहावा कीं नाहीं ? असंच कोणींहि म्हटल्याशिवाय राहतं ना पण तो सायमन मातवेइश आहे. त्यानंच मरीनाशीं परवा लग्न लावलं.

---

* शेतकऱ्यांचीं लग्नें रशियांत बहुतेक पावसाळ्यांत होतात. लेंट ( चाळीस दिवसांचा उपवास ) च्या दिवसांत लग्न करणें निषिद्ध मानलें जातें. आणि ईस्टरच्या सणानंतर तर शेतीच्या कामाला सुरवात होते. त्यामुळें लग्नसमारंभ करण्याला वेळच नसतो.

**अनीशा:**—ती खरोखर दैवाचीच म्हटली पाहिजे.

**शेजारीण:**—तो विधूर आहे. त्याला कांहीं मुलंहि आहेत वाटतं.

**मॅट्रियोना:**—चार मुलं आहेत! कोणत्या शहाण्या मुलीनं त्याच्याशीं लग्न केलं असतं? बरं, त्यानं तिला पत्करली अन् तीहि आतां खुषीत आहे. हें पहा मडकं मुळांतच कच्चं होतं त्यामुळं दारू बाहेर झिरपूं लागली.

**शेजारीण:**—अग बाई, लोक काय म्हणत असतील? अन् तो घरचा चांगला श्रीमंत आहे म्हणे!

**मॅट्रियोना:**—ते आतांपर्यंत तरी सुखानं रहात आहेत.

**शेजारीण:**—होय, तें खरंच आहे. ज्याला मुलंबाळं आहेत त्याच्याशीं लग्न करण्यास कोण तयार होणार? तो पहा, तो आपला मायकेल, काय सांगूं? तो इतका चांगला मनुष्य आहे....

[ शेतकऱ्याचा आवाज—ऊ ऽ ऽ माखा! ऊ ऽ ऽ! कुठं गेलील तरी कुठं! जा व ती गाय आंत हांकून घेऊन ये. ]

[ शेजारीण जाते. ]

**मॅट्रियोना:**—( शेजारीण ऐकण्याच्या टप्प्यांत आहे तोंपर्यंत आपल्या नेहमींच्या आवाजांत बोलते.) होय, ती पोरगी ना! बरं झालं तिचं लग्न झालं. कसं कां होईना, आपला म्हातारा निकिटाला त्रास देणार नाहीं. पण आतां....(एकदम आवाजांत बदल करून) ती दूर गेली. ( हळू बोलते. ) हें बघ, त्याला तूं तो चहा दिलास कां?

**अनीशा:**—त्याच्यासंबंधानं कांहीं बोलूं नका. तो आपल्या मरणानंच मरेल तेव्हां खरं! त्यांत कांहीं अर्थ नाहीं. अन् उगाच पाप मात्र पदरी घ्यायचं. ओ! ओ! काय करूं या कपाळाला! तुम्हीं मला त्या पुड्या काय म्हणून दिल्यात?

**मॅट्रियोना:**—त्या पुड्याचं काय! त्या तर झोंप येण्याच्या पुड्या आहेत. त्या देण्याला काय हरकत आहे? त्या दिल्यामुळं कांहीं वेडंवाकडं व्हायचं नाहीं.

**अनीशाः**--मी त्या झोंपेच्या पुड्यांसंबंधानं बोलत नाहीं. त्या दुसऱ्या पांढऱ्या पुड्यांसंबंधानं बोलत आहें

**मॅट्रियोनाः**--हें बघ बाळ, त्या पुड्या तर औषधी आहेत.

**अनीशाः**—( सुस्कारा टाकते. ) होय, मला तें ठाऊक आहे. तथापि मला त्याची भीति वाटते. याच्या त्रासानं मी गांजून गेलें आहें. यापेक्षां मेलेलें बरं; असं मला वाटतं पण तें करायला मला धैर्य होत नाहीं.

**मॅट्रियोनाः**—बर, तूं कांहीं तरी पुड्या दिल्यास ना ?

**अनीशाः**--मीं दोन पुड्या दिल्या.

**मॅट्रियोनाः**—त्याचा कांहीं परिणाम ?

**अनीशाः**—तो चहा मीं स्वतःच चाखून पाहिला. तो थोडासा जास्त कडवट लागला इतकंच. त्यानं तो चहा घेतला अन् म्हणतो काय, "चहा-देखील मला कडू लागूं लागला आहे." "आजारी माणसाला चव असती कुठं, त्याला सर्वच कडवट लागतं," मी म्हणालें. पण माई, कांही म्हणा, त्या गोष्टीची मला भीति वाटल्यावांचून राहिली नाहीं.

**मॅट्रियोनाः**--उगाच त्याचा विचार करीत नको बसूं ! मनुष्य असल्या गोष्टीचा जितका जितका जास्त विचार करील, तितकें तितकें तें वाईटच.

**अनीशाः**—तुम्ही मला त्या पुड्या दिल्या नसत्या व असलं पाप करायला लावलं नसतं तर बरं झालं असतं. माई, माई, मला त्या पुड्या तुम्ही कां बरं दिल्यात ?

**मॅट्रियोनाः**--बाळ, हें तूं काय बोलत आहेस तरी काय? देव तुझं भलं करो. कां माझ्यावरच उलटून पडतेस ? लक्ष्यांत ठेव, असलं भलतं सलतं बोलूं नकोस. उद्यां जर कां कांहीं घडून आलं, तर त्याच्याशीं माझा कांही संबंध नाही बरं ! मला यांतलं कांहीं माहीत नाहीं. कांहींसुद्धां कांहीं माहीत नाहीं. क्रॉसचं चुंबन घेऊन तसं शपथेवर मी सांगेन. मी तुला कस-ल्याहि पुड्या केव्हांच दिलेल्या नाहींत या असल्या पुड्या आहेत हें मला कधीं माहीतहि नव्हतं. हें बघ पोरी, तुझा तूं विचार कर. आम्ही परवांच तुझ्यासंबंधानें बोलत होतों नाहीं कां ! "गरीब बिचारी, किती हाल्लांत

दिवस काढीत आहे. सावत्र मुलगी, ती तर वेडसरच आहे; म्हातारा तर मरतच पडलेला आहे, तिचीं तर तो हाडं खात आहे. असल्या परिस्थितींत मनुष्य काय काय करणार नाहीं!"

**अनीशा:**—मी कांहीं तें नाकबूल करीत नाहीं. माझ्यासारखा प्रसंग दुसऱ्या कोणावर आला असता तर यापेक्षांहि वाईट गोष्टी त्यानं केल्या असत्या. असल्या परिस्थितीत तुम्ही असतां तर स्वतःला तरी तुम्हीं गळफांस लावून घेतला असता किंवा त्याचा गळा तरी दाबला असता. हें काय जिणं आहे!

**मॅट्रियोना:**—अगदीं बरोबर आहे. आतां स्वस्थ बसून वाट बघण्याला तर वेळच नाहीं. या नाहीं त्या कोणत्या तरी मार्गानें त्याच्याकडून पैसा काढलाच पाहिजे. अन् असं करायचं असेल तर त्याला तो चहा दिलाच पाहिजे.

**अनीशा:**—ओ, हो ऽऽ! माझं कपाळ! कपाळ! काय करावं हेंच मला तमजेनासं झालं आहे. मी इतकी घाबरून गेल्यें आहें कीं कांहीं सांगतां सोय नाहीं. तो आपल्या आपणच कां मरत नाहीं? त्याचं पाप माझ्या माथ्यावर नको आहे.

**मॅट्रियोना:**—(दुष्टपणानें) अन् त्यानं ते पैसे कां दाखवू नयेत? ते काय तो आपल्याबरोबर घेऊन जाणार आहे? दुसऱ्या कोणालाहि ते मिळतां कामा नयेत! पण हें त्याचं करणं काय रास्त आहे, असं म्हणतां येईल? देव करो अन् येवढी रक्कम उगीच दुसऱ्याच्या हातांत न जावो. खरोखरी हें पाप नाहीं कां? तो हें काय करीत आहे? त्यानं असा विचार करणं योग्य आहे कां!

**अनीशा**—मला हें कां ऽऽ हीं समजत नाहीं. त्यानं माझा इतका छळ मांडला आहे कीं, मरण बरं असं मला वाटू लागलं आहे.

**मॅट्रियोना**—तुला समजत नाहीं म्हणजे काय? हा तर अगदीं साधा व स्पष्ट व्यवहार आहे. या वेळीं तूं थोडी कां घसरलीस तर सर्व जन्मभर तुला पश्चात्ताप करीत बसावं लागेल. तो ते पैसे आपल्या बहिणीला देऊन टाकील अन् तुझ्याजवळ कवडीहि रहायची नाहीं.

**अनीशा**—होय, माई, त्यानं तिला बोलावणं पाठविलं आहे. मला गेलंच पाहिजे.

**मॅट्रियोना**:—बरं, आतां थोडी थांब. आधण तयार कर. त्याला आपण थोडा चहा देऊं. अन् त्याची झडती घेऊं. आपल्याला सर्व सांपडेल. कांहीं भिऊं नको.

**अनीशा**—माई, माई, समजा कांहीं भलतंसलतं झालं तर ?

**मॅट्रियोना**:—त्याचं आतां काय ? उगाच वाट पहात राहण्यांत अर्थ काय ? आपल्या डोळ्यांदेखत आपल्या हातांतून पैसा निसटून जावा असं तर तुझं म्हणणं नाहीं ? जा अन् मी काय सांगतें तें कर.

**अनीशा**:—बरं, मी जातें व आधण ठेवतें.

**मॅट्रियोना**:—जा, बाळ तेवढं काम कर, म्हणजे पुन्हां पश्चात्ताप करण्याची पाळी यायची नाहीं. हं, ठीक आहे !

( अनीशा जाण्याकरितां मागें वळते. मॅट्रियोना तिला परत बोलावते. )

**मॅट्रियोना**:—बरं, एक लक्ष्यांत ठेव. निकिटाला यांतलं कांहीं सांगूं नकोस बरं कां ! तो आहे खुळचट ! देव करो अन् या पुड्यांची भानगड त्याच्या कानावर न जावो. हें त्याला कळल्यावर तो काय करील न काय नाही, हें देवच जाणे. त्याचं अंतःकरण फार कोमल आहे. तुला ठाऊक आहे ! कोंबडीचं पिलूं देखील मारायला तो तयार व्हायचा नाहीं. त्याला कांहीं सांगूं नको. त्याला कांहीं समजलं नाहीं तरच हें काम नीट रीतीनं पार पडेल. (याच वेळी पीटर दरवाजांत येऊन उभा राहतो व ती गर्भगळित होते )

**पीटर**:—( भिंतीला धरून देवडीपर्यंत जातो व बसल्या आवाजांत तो हांका मारूं लागतो. ) एकाद्यानं हांका तरी किती माराव्या ? ए, अनीशा. ए. तें तिथं कोण आहे ? (बांकावर आंग टाकतो.)

**अनीशा**:—( कोंपऱ्यांतून बाहेर पडते) बाहेर कां आलास ? जिथं पडला होतास तिथं बरं नव्हतं कां ? इथं कशाला आलास !

**पीटर:**—ती पोरटी मार्थाकडे गेली कां? मला हें आतां सहन करवत नाही.....अयय ऽऽ! मरण जितकं लवकर येईल तितकं बरं होईल.

**अनीशा:**—तिला नव्हता वेळ! मीं तिला नदीवर पाठविलं, जरा थांबा, मला फुरसत झाली की मीच जातें.

**पीटर:**—नानीला पाठीव. ती आहे कुठं?

**अनीशा:**—मीं तिला अगोदरच बोलावणं पाठविलं आहे.

**पीटर:**—मग ती आहे कुठं?

**अनीशा:**—कुठं गेलीय कुणाला ठाऊक? पटकी आली मेलीला!

**पीटर:**—हाय! हाय! मला हें सहन होत नाहीं, माझ्या पोटांत जशी काय आगच पडली आहे. जणू काय कोणी तरी माझ्या पोटाला गिरमिटानं भोंकच पाडीत आहे असं मला वाटतंय! एकाद्या कुत्र्यासारखं मला असं टाकून कां दिलं आहेस.....घोटभर पाणी द्यायलादेखील मजजवळ कोणी नाही! .....ओय, ओय, नानीला इकडं पाठवून दे.

**अनीशा:**—ही काय इथंच आहे. नानी, जा. तुझ्या बापाकडे जा.

[ नानी धांवत आंत येते. अनीशा घराच्या कोंपऱ्यामागें जाते. ]

**पीटर:**—जा, तूं आत्तां मार्थाआत्याकडे जा,अन् तिला मी बोलावीत आहें असं सांग. तिला आलंच पाहिजे असं सांग. माझं तिच्याशीं जरूरीचं काम आहे.

**नानी:**—बरं जातें.

**पीटर:**—थोडी थांब, तिला लवकर यायला सांग. मी मरत आहें असं तिला सांग. अययय ऽ!

**नानी:**—आत्तां माझी शाल घेतें व जातें. ( बाहेर धांवत जाते. )

**मट्रियोना:**—( डोळे मिचकावीत ) चल, आतां जलदी कर. बाळ, झोंपडींत जा, अन् कुत्रा ज्याप्रमाणें आपलें भक्ष्य शोधण्याकरितां हुंगत फिरत असतो त्याप्रमाणें झोंपडींतील कानाकोंपरा अगदीं शोधून काढ. तूं तिकडे तें काम कर, मी याची येथें झडती घेतें.

**अनीशाः**--( मॅट्रियोनाला उद्देशून ) तुम्ही इथं आल्यामुळें मला थोडा धीर आला आहे. (देवडीवर पीटरकडे जाते. त्याला उद्देशून ) आधण तयार करूं का? आपल्या मुलाला भेटण्याकरितां मॅट्रियोना आली आहे, तेव्हां त्यांच्याबरोबर चहा घ्यायला कांही हरकत नाही.

**पीटरः**—बरं तर आधण ठेव. ( अनीशा घरांत जाते. मॅट्रियोना देवडीवर येते. )

**पीटरः**--कां कस काय, ठीक आहे ना?

**मॅट्रियोनाः**—( नमस्कार करीत ) कां तुमचं कसं काय आहे? अद्यापि आजारीच दिसतां आहां? अन् माझ्या म्हाताऱ्यानं मला इकडं पाठविलं आहे. "जा अन् तुमची प्रकृति कशी आहे हें पाहून ये" असं त्यानं मला सांगितलं. त्यांनीं तुम्हांला नमस्कार सांगितला आहे. ( पुन्हां नमस्कार करते. )

**पीटरः**--मी मरत आहें.

**मॅट्रियोनाः**--अरे रे, पीटर इग्नेटिश, मला दिसतच आहे. माणसामागं रोग हा असायचाच. तुम्ही या रोगामुळें अगदीं वाळून गेलां, अगदीं चिपाड झालां अ! म्हणूनच मी तुम्हांला भेटायला आल्यें. एकदरींत लक्षण कांहीं बरं नाहीं.

**पीटरः**--माझे दिवस आतां भरत आले.

**मॅट्रियोनाः**--देवाची मर्जी, पीटर इग्नॅटिश, देवाची मर्जी. तुम्हीं आतां प्रायश्चित्त घेतलंत. आतां तीर्थहि घ्या. देवाच्या मर्जीपुढें काय करणार? तुमची बायको फार चांगली बाई आहे. देव भलं करो. तुमचे अंत्य संस्कार ती अगदीं विधिपूर्वक करील. तुमच्या आत्म्याच्या मुक्तीकरितां प्रार्थना करण्यांत येतील. अन् हें सर्व जसं अगदीं व्हायला पाहिजे तसं होईल. माझा मुलगा या दिवसांत तुमच्या घरचा सर्व कारभार पाहील.

**पीटरः**--माझ्यामागें घरांत पहायलाच कोणी नाहीं. तिची बुद्धि स्थिर नाहीं. तिच्या माथ्यांत अनेक खूळं शिरलीं आहेत. हें असं कां झालं मला ठाऊक आहे. मला सर्व ठाऊक आहे. अन् माझी मुलगी तर तरुण व खुळचट आहे. सगळं बारदान मीं गोळा केलं आहे पण त्याच्याकडं पहाय-

लाच कोणी नाहीं. हें असं पाहिलं म्हणजे वाईट वाटल्याखेरीज रहात नाही ( स्फुंदून स्फुंदून बोलतो. )

**मॅट्रियोना**:—कां, पैशाच्या किंवा इतर कांहीं भानगडी असल्यास त्याची व्यवस्था कशी करायची हें तुम्ही सांगूं शकतां.

**पीटर**:—( घरांत गेलेल्या अनीशला उद्देशून ) नानी गेली कां ?

**मॅट्रियोना**:—( स्वगत ) पहा त्याला आठवण झाली.

**अनीशा**:—(आंतूनच बोलते.) ती लगेच ताबडतोब गेली. या आंत या. येतां ना ? मी तुम्हांला हात देतें.

**पीटर**:—मला थोडंसं इथं बसूं दे. माझं इथं हें शेवटचंच बसणं आहे. आंत कसं अगदीं गुदमरते. हा ! हा ! मला कसंसंच वाटत आहे. माझ्या काळजाला तर जणूं काय आगच लागली आहे ...... आतां मरण जितकं लवकर येईल तितकं बरं.

**मॅट्रियोना**:—देवाची आज्ञा झाली पाहिजे ना ! त्याशिवाय मरण कसं येईल ? मरणं काय, जगणं काय, सगळं देवाच्या इच्छेवर अवलंबून आहे. पीट इग्नॅटिश, मरणं येईलच असं सांगतां येत नाही. कदाचित् बरेहि व्हाल. आमच्या गांवांत असंच झालं. एक मनुष्य अगदीं मरायला टेकला होता पण तो वांचला.

**पीटर**:—नाहीं, मी आजच मरणार असं मला वाटतं. मलाच तसं वाटूं लागलं आहे. ( मागें टेकतो व डोळे मिटून घेतो )

**अनीशा**:—(प्रवेश करते) कां आंत यायचं कां नाहीं ? काय माणसाला असं ठांबून ठेवायचं ! पीटर, ए पीटर !

**मॅट्रियोना**:—( बाजूला जाते व अनीशाला बोटांनीं खुणावते. ) बरं काय झालं ?

**अनीशा**:—( देवडीच्या पायऱ्या उतरून खालीं येते.) तिथं नाहीं.

**मॅट्रियोना**:—पण तूं सगळीकडं पाहिलंस कां ? अगदी जमीन उकरून ?

**अनीशा**:—नाहीं, तिथं नाहीं. कदाचित् छप्पराखालीं असेल. कारण काल तो तिकडं वावरत होता.

**मॅट्रियोना**:—जा, पहा, पहा, अगदीं सगळीकडं शोधून पहा. जिभेला रक्ताची चव लागावी त्याप्रमाणं शोधून पहा. पण हें पहा, तो आजच मरेल. त्याचीं नखं निळीं पडत चाललीं आहेत व त्याचा चेहरा तर पांढरा फटफटीत पडला आहे. कां आधण तयार आहे?

**अनीशा**:—अगदीं बेतांत आहे.

**निकिटा**:—( दुसऱ्या बाजूनं येतो. अगदीं दरवाजापर्यंत घोड्यावर बसून येतो. पीटरकडे त्याचें लक्ष्य जात नाहीं. मॅट्रियोनाला उद्देशून ) आई, ठीक आहे ना? घरचं सर्व बरं चाललंय ना?

**मॅट्रियोना**:—देवाच्या कृपेनं बरं चाललं आहे. आम्ही सगळीं बरीं आहों व घरांत मीठभाकरी कां होईना, खायला आहे!

**निकिटा**: – बरं, आमच्या धन्याचं कसं काय?

**मॅट्रियोना**:—हु:श, तो तिथं बसला आहे, ( देवडीकडे बोट दाखविते. ),

**निकिटा**:—बरं बसू दे, मला काय करायचंय !

**पीटर**:—(डोळे उघडतो) निकिटा, मी हांका मारतों आहें ना! निकिटा, इकडे ये.

[निकिटा पुढें येतो. अनीशा व मॅट्रियोना आपसांत कुजबुज करतात.]

**पीटर**:—इतक्या लवकर कां आलास?

**निकिटा**:—नांगरटीचं काम संपविलं.

**पीटर**:—तो पुलापलीकडील तुकडा नांगरलास कां?

**निकिटा**:—तिथं जायचं म्हणजे फारच दूर!

**पीटर**:—फारच दूर! अन् इथून तर तो फारच दूर आहे! आतां तुला मुद्दाम जावं लागेल. आतांच केलं असतंस हातासरशीं तेंहि काम उरकलं असतं. ( अनीशा मागें बाजूस उभी राहून ऐकते. )

**मॅट्रियोना**:—(पुढें येते.) हें पहा सोन्या, तूं आपल्या धन्याकरितां आणखी थोडं अंग मोडून काम कां करीत नाहीस? तुझा धनी आजारी आहे अन् त्याचा सगळा भार तुझ्यावर आहे. तूं घरीं जसं काम करतोस

तसं इथंहि आपल्या धन्याचं काम अगदीं अंग मोडून केलं पाहिजे. मी तर नेहमीं तुला हेंच सांगत असतें.

**पीटर**:—बरं तर, हो! हो!.... बटाटयाचं बियाणं काढून आण. बायका त्याची चाळवाचाळव करतील व निवडून काढतील.

**अनीशा**:—(स्वगत) अगदीं भ्यायला नको. मी इथून जात नाहीं. तो प्रत्येकाला पुन्हां इथून बाहेर पाठवीत आहे. पैसे त्याच्याजवळच असले पाहिजेत. आतां ते तो कुठं तरी लपवून ठेवूं पहात आहे.

**पीटर**:—नाहीं तर .... ऊं! ऊं! (विवळतो) जेव्हां पेरणीची वेळ येईल त्या वेळीं ते सडून गेलेले आढळतील.

**मॅट्रियोना**:—(देवडीवर धांवत जाते व पीटरला तो उठत असतांना मदत करते.) तुम्हांला मी झोंपडींत घेऊन जाऊं कां?

**पीटर**:—मला आंत घेऊन जा. (थांबतो.) निकिटा!

**निकिटा**:—(रागानें) आतां पुढं काय करायचं?

**पीटर**:—तुझी माझी ही अखेरचीच भेट .... मी आज मरतों. मला क्षमा करा.* मीं तुमचा कांहीं अपराध केला असल्यास मला क्षमा करा. कायेनें व वाचेनें मीं तुमचा कांहीं अपराध केला असल्यास मला क्षमा करा. .... मनुष्याच्या हातून सगळ्या प्रकारचे अपराध होतात. मला क्षमा करा.

**निकिटा**:—क्षमा करायला तुम्ही केलंय काय? मी स्वतः खुद्द्च पातकी आहें.

**मॅट्रियोना**:—हे बघ सोन्या, असं निष्ठुरपणानं बोलूं नकोस.

**पीटर**:—ख्राइस्तच्या उदाहरणाकडे पाहून तरी मला क्षमा करा. (रडूं लागतो.)

---

* क्षमायाचनेची चाल रशियांत सामान्यत: रूढ आहे. पण नेहमींच हा केवळ शिष्टाचारच आहे, असें म्हणतां येत नाहीं. निकिटाचें पहिलें उत्तर डळमळीत होतें परंतु "ईश्वर तुम्हांला क्षमा करो" हें त्याचें दुसरें उत्तर मात्र तेथल्या रूढ वहिवाटीला धरूनच आहे.

**निकिटा:**—( पश्चात्तापाचें ढोंग आणून बोलूं लागतो. ) पीटर दादा, ईश्वर तुम्हांला क्षमा करील. तुमच्याविरुद्ध मी तक्रार करावी असं तुम्हीं कांहीं केलेलं नाहीं. तुम्ही माझा कांहींच अपराध केलेला नाहीं. तुम्हींच मला क्षमा केली पाहिजे. माझ्या हातून तुमच्या विरुद्धच भयंकर गुन्हा झालेला असेल, असाच जास्त संभव आहे. ( रडूं लागतो. )

[ पीटर स्फुंदत स्फुंदत आंत जाऊं लागतो, मॅट्रियोना त्याला धरून नेऊं लागते. ]

**अनीशा:**—काय करूं, माझं कपाळ फुटलं! असं करण्यांत त्याचा कांहीं तरी उद्देश असला पाहिजे. (निकिटाकडे जाते. ) पैसे जमिनीत पुरून ठेवले आहेत असें तूं म्हणालास नाहीं कां ? ते तिथं नाहींत.

**निकिटा:**—( उत्तर देत नाहीं व रडूं लागतो. ) त्यानं माझं कधीं वाईट केलं नाहीं. उलट त्यानं माझं हितच केलं आहे. अन् मी मात्र बहकलों व पाहिजे तें केलं !

**अनीशा:**—बस्स पुरें झालं ! पैसे कुठं आहेत ?

**निकिटा:**—(रागानं ) मला काय ठाऊक ? जा तूं स्वत:च जा, अन् काय पाहायचं तें पहा.

**अनीशा:**—तूं आज असा इतका हळवा कां झाला आहेस ?

**निकिटा:**—त्याच्या स्थितीकडे पाहून मला वाईट वाटतें. तो कसा रडत होता! त्यामुळें माझं अंत:करण कळवळून गेलं.

**अनीशा:**—पहा, पहा, मोठा दयेचा पुतळाच झाला कीं नाहीं ! त्याची कीव करायला कोणी तरी पाहिजेच होतं. तो तुला कुत्र्यासारखा वागवीत असतो. तूं घरांतून बाहेर जावं म्हणून आतांच तो हुकूम सोडीत होता ना ! कींवच करायची असेल तर माझ्याबद्दल तूं कीव केली पाहिजेस.

**निकिटा:**—तुझी कींव काय म्हणून करायची ?

**अनीशा:**—तो जर मेला अन् त्यानं पैसे कुठंतरी लपवून ठेवले......

**निकिटा**:--भ्यायचें कांही कारण नाहीं. तो पैसे कुठंहि लपवून ठेवणार नाही.

**अनीशा**:--प्रिय निकिटा, हें पहा, त्यानं आपल्या बहिणीकडे आतांच निरोप पाठविला आहे. त्यानं तिला इथं बोलाविलं आहे. सर्व पैसे तिला देऊन टाकायचा त्याचा विचार आहे. असें होईल तर तें आपल्या हिताचं नाहीं. त्यानं तिला जर पैसे देऊन टाकले तर आपण जगायचं कसं ? ते मला घरांतून बाहेर घालवून देतील. तूंच थोडी खटपट करून पाहीनास ? काल रात्रीं तो पडवींत गेला होता असं तूं म्हणालास !

**निकिटा**:--मी त्याला तिकडून येतांना पाहिलं पण त्यानं ते तिथं कुठं पुरून ठेवले, हें कसं समजायचं ?

**अनीशा**:--ओय, ओय, काय करूं माझ्या या कपाळाला ! मीच जातें व सर्व शोधून पाहतें. ( निकिटा बाजूला होतो. )

**मॅट्रियोना**:--( झोंपडीतून बाहेर येते. व देवडीच्या पायऱ्या उतरून अनीशा व निकिटा यांच्याकडे जाते. ) आतां दुसरीकडं कुठं जायला नको. पैसे त्यानं आपल्याजवळच ठेवले आहेत. त्यानं आपल्या गळ्याभोंवतीं हमिणी बांधलेली माझ्या हाताला लागली.

**अनीशा**:—ओय ! ओय ! माझं कपाळ ! माझं कपाळ !

**मॅट्रियोना**:—आतां तूं जर सावध राहिली नाहींस तर जन्मभर तुला भटक्या मारीतच रहावं लागेल. जर त्याची बहीण आली तर पैशाला कायमचाच रामराम ठोकावा लागेल !

**अनीशा**:--तुमचं म्हणणं खरं आहे. ती आली कीं, तो तिला ते देऊन टाकील. मग काय करायचं ? ओय ओय ! या कपाळानं तर माझा पिच्छा पुरवला आहे.

**मॅट्रियोना**:—काय करायचं म्हणे ! हे पहा, आधण तयार आहेना ? जा अन् चहा तयार कर. व नंतर ( कुजबुजते ) त्या पुडीत जें थोडसं औषध शिल्लक राहिलं तें त्यांत घाल. जेव्हां तो चहा पिऊन टाकील तेव्हां ते पैसे काढून घे. तो कांहीं सांगणार नाहीं. मुळीं सुद्धां भिऊं नको.

**अनीशाः**—अगबाई, मला तर अगदीं भीति वाटते.

**मॅट्रियोनाः**—आतां बडबडत बसूं नकोस. थोडं हुशारीनं काम कर. त्याची बहीण आली तर तिला त्याच्याजवळ जाऊं न देण्याची खबरदारी मी घेईन. लक्ष्यांत ठेव कांहीं चूक करूं नको ! त्याच्याजवळचे पैसे काढून घे. ते इकडे घेऊन ये. निकिटा ते कोठें तरी लपवून ठेवील.

**अनीशाः**—अयाई ! माझं कपाळ, कपाळ ! माझं काय होणार आहे मला कळत नाही.......

**मॅट्रियोनाः**—पुन्हां त्यासंबंधानें बोलूं नकोस, सांगून ठेवतें. मी जसं सांगत आहें तसं कर. निकिटा !

**निकिटाः**--काय पाहिजे ?

**मॅट्रियोना**--तूं इथंच बसून रहा. कांहीं काम पडलं, तर तें तुला सांगतां येईल.

**निकिटाः**—(हातवारे करतो.) अरे, ह्या बायका म्हणजे काय करतील न् काय नाहीं ! कोणालाहि या चांगल्या कचाट्यांत आणल्याशिवाय रहायच्या नाहींत. जाऊं दे, यांच्यांशीं संबंध नको ! मी खरोखरीच आपला येथून जातों व बटाटे आणतों.

**मॅट्रियोनाः**—(त्याचा हात धरते.) थांब, इथंच थांबून रहा. मी तुला काय सांगतें आहें ?

[ नानी प्रवेश करते. ]

**अनीशाः**--बरं, काय झालं ?

**नानीः**—ती खालीं तिकडं आपल्या मुलीच्या मळ्यांत गेली होती, ती येत आहे.

**अनीशाः**--काय येत आहे ? आतां काय करावं ?

**मॅट्रियोनाः**--पुष्कळ वेळ आहे. मी सांगेन तसं करशील तर आपल्याला बराच वेळ सांपडेल.

**अनीशा:**—काय करावं हेंच मला कळत नाही. माझं डोकं अगदीं सुन्न झालं आहे. नानी ! जा बाळ, अन् ती वासरें कुठं भटकत आहेत तीं पहा. ती सगळीं बाहेर पळून गेलीं असतील. मी तर घाबरून गेलें आहे—मला कांहीं धीर होत नाहीं.

**मॅट्रियोना:**—चल, पाण्याला उकळी फुटली असेल.

**अनीशा:**—अगाई, माझं कपाळ—आतां ही तिडीक मला सहन होत नाही. (बाहेर जाते.)

**मॅट्रियोना:**—(निकिटाकडे येते.) हें पहा सोन्या. (त्याच्याजवळ बसते.) तुझ्यासंबधानेंहि आतां विचार केला पाहिजे. होईल कसं तरी, म्हणून त्या बाबतीत दुर्लक्ष्य करून चालायच नाहीं.

**निकिटा:**—कां, कसला विचार ?

**मॅट्रियोना:**—कां, हाच विचार कीं, तूं आपल्या आयुष्याचे दिवस कसे घालविणार ?

**निकिटा:**—दिवस कसे घालविणार ? दुसरे लोक दिवस काढतात तसेच मीहि काढीन.

**मॅट्रियोना:**—तो म्हातारा आज बहुतेक मरेल.

**निकिटा:**—बरं तो मेला तर, ईश्वर त्याच्या आत्म्याला शांति देवो ! मला त्याच्याशी काय करायचं आहे ?

**मॅट्रियोना:**—( बोलत असतांना देवडीकडे पहात असते ) हें पहा सोन्या, जीं माणसं मागं जिवंत राहतात, त्यांना पुढं जगावं कसं याचा विचार करावाच लागतो. असल्या बाबतींत फारच हुशारीनं काम घ्यावं लागतं. बाळ, कां, तुला काय वाटतं ? या तुझ्या कामाकरितां मी इतकी लांब चालून आलें. या भानगडी मिटविण्याकरितां मी इतकी पायपिटी केली व माझे पायहि दुखून आले. उद्यां वेळ आली म्हणजे तूं मला विसरून जातां कामा नये.

**निकिटा:**—बरं, तूं कसल्या भानगडींत शिरली आहेस ?

**मॅट्रियोना**:--या सगळ्या तुझ्याकरितां. तुझे पुढले आयुष्याचे दिवस सुखानें जावे, याकरितां अशा योग्य वेळेला तूं खटपट केली नाहीस तर तुला कांहीं मिळायचें नाहीं. इव्हॅन मोसेइश तुला माहीत आहे ! बरं, मी त्याच्याकडेहि गेले होतें. परवांच मी त्याच्याकडे गेलें होतें. एक गोष्ट त्याला विचारावयाची होती. तुला माहीत आहे ! मी त्याच्याकडे गेलें, तिथं बसलें. इकडल्या तिकडल्या चार गप्पा मारल्या अन् मग मुद्यावर आलें. " इव्हॅन मोसेइश, सांगा पाहूं माणसावर असा एक प्रसंग आला, तर त्यांतून त्यानं कस पार पडायचं सांगा पाहूं. समजा, " मीं त्याला विचारलें, " एका विधुर शेत-कऱ्यानें दुसरें लग्न केलें; पहिल्या बायकोपासून झालेली त्याला फक्त एकच मुलगी आहे. अन् दुसऱ्या बायकोपासूनहि त्याला एक मुलगी झालेली आहे. पुढें हा शेतकरी मरण पावला, तर त्याच्या विधवेशीं लग्न करून एकाद्या बाहेरच्या माणसाला त्याची इस्टेट मिळूं शकेल काय ? किंवा ह्या दोन्ही मुलींची लग्नें करून देऊन त्याला या इस्टेटीचा मालक होतां येईल? " "होय, तसेंहि होऊं शकेल, " तो म्हणाला. " असं करायचं म्हणजे बरीच खटपट करावी लागेल. ही गोष्ट साधेल, पण थोडे पैसे मात्र खर्चं करावे लागतील. पण पैसे नसतील तर मात्र या भानगगडीत पडण्यांत कांही अर्थ नाही "

**निकिटा**:--(हंसतो.) तें तर काय सांगायलाच नको. फक्त पैसे उकळा-यची गोष्ट बोला. पैसे नको आहेत कुणाला ?

**मॅट्रियोना**:--बरं मग सोन्या, मीं त्याला या गोष्टी स्पष्टपणें विचारून घेतल्या आहेत. त्याचं म्हणणं असं कीं, " अगदीं प्रथम, तुमच्या मुलानं गांवच्या रजिस्टरांत आपलं नांव नोंदून घेतलं पाहिजे--त्याला कांही पैसे लागतील. गांवच्या पंचमंडळींना मेजवानी द्यावी लागेल; मग ते कशावरहि सही करतील. पण या सगळ्या गोष्टी अक्कलहुशारीनें करून घेतल्या पाहिजेत." पहा. (आपल्या हातरुमालाची गांठ सोडून त्यांतून एक कागद बाहेर काढते.) त्यानं हा कागद लिहिला आहे. वाच. तूं तर शिकलेलाच आहेस. तुला या सगळ्या गोष्टी माहीतच आहेत. (निकिटा वाचतो.)

**निकिटाः**--पंचांनीं सही करण्याकरितां तयार केलेला हा कागद आहे. याला कांही फारसं शहाणपण लागत नाहीं.

**मॅट्रियोनाः**--परंतु इव्हॅन मोसेइशनें आपल्याला काय काय करायला सांगितलं आहे, हें तरी ऐकून घेशील कीं नाही? " कसंहि करा " तो म्हणाला, " पण पैसे हातांतून निसटून जाऊ देऊं नका. जर कां पैसा हाताला लागला नाहीं तर पुढलं कांहीं साधायचं नाही. सगळं कांहीं पैशापाशीं आहे. " मग विचार कर. सोन्या, सगळ्या गोष्टींचा आतां कसा निकाल सांगण्याची वेळ आली आहे.

**निकिटाः**--मला त्याचा विचार करून काय करायचंय. ते पैसे तिचे आहेत. तिचां तिनं विचार करावा.

**मॅट्रियोनाः**—हें पहा बाळ, तूं असं कसं म्हणतोस? असलीं कामं बायकांच्या हातून कशीं उरकतील? जरी तिला पैसे मिळाले तरी पुढलं हें सगळं काम तिला कसं जुळवून आणतां येईल? बायकांच्या हातून काय होणार हें प्रत्येक मनुष्य जाणतोच. बायका त्या बायकाच. तूं किती झालं तरी पुरुष आहेस. तूं ते लपवूं शकशील व पाहिजे तें करूं शकशील. कांहीं झालं तरी तुला थोडी जास्त अक्कल आहे. प्रसंगीं निभावून कसं न्यायचं हें तुलाच जास्त समजेल.

**निकिटाः**—आहा, तुम्हां बायकांच्या साऱ्या कल्पना निरर्थक असायच्या.

**मॅट्रियोनाः**—निरर्थक काय म्हणून! तूं तो पैसा आपल्या ताब्यांत घे, म्हणजे मग ती बाईहि तुझ्या ताब्यांत येईल अन् जर ती उलटली व चिर-चिर करूं लागली तर लगाम ताणून धरायचं तुझ्या हातीं आहेच.

**निकिटाः**--मरा तुम्ही सगळीं जणं. मी इथून निघून जातों.

**अनीशाः**—(अगदीं निस्तेज चेहरा झालेली. झोंपडींतून धांवत मॅट्रियोनाकडे येते.) अगदीं तेंच बरोबर होतं. त्याच्याजवळच ते पैसे होते. हे पहा ते. (आपल्या पदराखालीं कांहीं असल्याचें दाखविते.)

**मॅट्रियोना**:--दे ते निकिटाजवळ, तो ते लपवून ठेवील. निकिटा, घे ते अन् ते कुठं तरी लपवून ठेव.

**निकिटा**:--ठीक आहे. इकडे आण.

**अनीशा**:--ओऽहो ! माझं कपाळ किती दुखतंय् म्हणून सांगूं ! नाहीं, तें सर्व माझं मीच करतें. ( दरवाजाकडे जाते. )

**मॅट्रियोना**:—(तिचा हात धरून) तूं जातेस तरी कुठं ? सगळा गोंधळ करून ठेवशील. ती पहा त्याची बहीण येत आहे. निकिटाजवळ पैसे दे. त्याचें पुढें काय करायचें तें तो बरोबर करील. तुमच्या सगळ्यांच्या हातून कांहीं जमायचें नाहीं. ती पहा बहीण आलीच. दे ते. त्याच्या जवळ दे. त्याचं काय करायचं हें त्याला सर्व माहीत आहे. ए, मठ्ठ कुठली !

**अनीशा**:--(घुटमळते.) ओ, हो, माझं कपाळ, कपाळ !

**निकिटा**:--बरं तर दे इकडं माझ्यापाशीं दे. मी ते कुठं तरी पुरून ठेवतों.

**अनीशा**:--ते कुठं पुरून ठेवशील ?

**निकिटा**:--(हंसत) तुला इतकी भीति कां वाटते ?

[अकुलिना प्रवेश करते. धुतलेले कपडे तिच्या खांद्यावर असतात.]

**अनीशा**:--माझं कपाळ दुखायचं रहात नाहीं. काय करूं ? (पैसे देते.) निकिटा, जागा नीट लक्ष्यांत--बरं !

**निकिटा**:--कां, येवढी भितेस कां ? मी अशा ठिकाणीं ते लपवून ठेवीन कीं ते माझे मलाच सांपडायचे नाहींत. (जातो.)

**अनीशा**:--( भयग्रस्त होऊन उभी राहते. ) अहो माई, समजा तो.....

**मॅट्रियोना**:--बरं, तो मेला कां ?

**अनीशा**:—होय, तो मेला असं वाटसं. कारण मीं जेव्हां पैसे काढून घेतले तेव्हां तो हलला नाहीं.

**मॅट्रियोना**:--जा आंत जा, ती बघ, तिथं अकुलिना उभी आहे.

**अनीशा**:--बरं मी तिकडं जाऊं ? मीं पाप केलं अन् त्यानं पैसे घेतले.

**मॅट्रियोना**:--आपलं काम झालं, जा आंत ती पहा मार्था आली !

**अनीशा**:--आतां तिकडं गेलं पाहिजे. माझा त्याच्यावर विश्वास आहे. आतां काय होणार, कोणास ठाऊक ! ( जाते.)

**मार्था**:--( एका बाजूनें प्रवेश करते. अकुलिना दुसऱ्या बाजूनें प्रवेश करते. अकुलिनाला उद्देशून ) मी यापूर्वीच आलें असतें. पण मी आपल्या मुलीच्या घरीं गेलें होतें. बर, म्हाताऱ्याच कसं काय आहे ? काय तो मरत आहे ?

**अकुलिना**:--( कपडे खालीं ठेवते.) मला नाहीं माहीत ! मी नदीवर गेलें होतें.

**मार्था**:--( मॅट्रियोनाकडे बोट दाखवून ) तें कोण आहे ?

**मॅट्रियोना**:--मी झुवोहून आलें. मी निकिटाची आई, झुवोहून आतांच आलें. नमस्कार, तो सारखा झिजत चालला आहे. गरीब बिचारा, तो तुमचा भाऊच नाहीं कां ? तो स्वत:च बाहेर आला. "बहिणीकडे निरोप पाठीव," असें तो म्हणाला. "कारण," तो पुन्हां म्हणाला .... काय सांगूं, मला तर वाटतं तो मेला असावा.

**अनीशा**:--( किंकाळया फोडीत धांवत येते. खांबाला धरून लोंबकळते आणि रडूं लागते.)* अयाई, ऊ-ऊ-ऊ मला सोडून कुठं गेलांत हो, मला कसं सोडून गेलांत, मी आतां रंडकी झालें ...मला एकटीला सोडून गेलांत, मीं आतां कसे दिवस काढूं .... तुम्हीं आपले डोळे मिटून घेतले ना !

[ शेजारीण प्रवेश करते. मॅट्रियोना व शेजारीण अनीशाच्या खांकेंत हात घालून तिला आधार देतात. लोकांची गर्दी होते. ]

---

* अशा रीतीनें मोठ्यानें रुदन करण्याची रशियांत चाल आहे. अन् शेतकरीसमाजांत तर असें करणें अवश्यच आहे असें मानलें जातें.

[ गर्दीतून आवाज येतो--प्रेताची तयारी करायला म्हाताऱ्या बायांना आंत पाठवून द्या. ]

**मॅट्रियोना:-** -(हाताच्या अस्तन्या मागें सरकावते.) भांड्यांत पाणी भरून ठेवलं आहे कां ? पण आधणाचं भांडं अद्याप ऊनच असेल. मीहि जातें. व थोडा हात लावतें.

[ पडदा ]



# अंक तिसरा

[ तीच झोंपडी. हिंवाळा. दुसऱ्या अंकांत घडलेल्या हकिकतीनंतर ९ महिने. अनीशा साधा पोषाख करून हातमागावर कापड विणीत बसलेली असते. नानी माळ्यावर असते.]

**मिट्रिशः**—(एक म्हातारा कामगार प्रवेश करितो आणि बाहेर कामाकरितां नेलेल्या जिनसा खालीं ठेवतो.) देवा, देवा, कृपा कर बाबा! बरं, अद्याप धनी घरीं परत नाहीं आला ?

**अनीशाः**—काय ?

**मिट्रिशः**—निकिटा अद्याप गांवांतून परत नाहीं आला ?

**अनीशाः**—नाहीं.

**मिट्रिशः**—गुत्त्यावर गेला असला पाहिजे. अरे देवा!

**अनीशाः**—गंजीच्या परड्यांतील काम संपविलेंस कां?

**मिट्रिशः**—तुला काय वाटतं? सगळं करायचं तसं केलं आहे. सगळ्यावर गवत आंथरून ठेवलें आहे! अर्धवट काम करणं मला आवडतच नाहीं. अरे देवा, पवित्र निकोलस! (हातावर पडलेल्या घट्ट्यांना कुरतडूं लागतो.) पण आतांपर्यंत घरीं यावयास पाहिजे होता.

**अनीशाः**—त्याला कशाची घाई आली आहे! त्याला पैसा मिळाला आहे अन् तो त्या पोरीबरोबर मजा मारीत आहे. मी म्हणतें....

**मिट्रिशः**—पैसा असल्यावर चैन कां करूं नये? अन् अकुलिना गांवांत कशाला गेली आहे?

**अनीशाः**—तें तिलाच विचार. ती कशाकरितां गेली हें मला कसं समजणार!

**मिट्रिशः**—काय गांवांत ना! पैसा असल्यावर गांवांत हव्या त्या वस्तू विकत मिळतात. अरे देवा!

**नानी**:—आई, मीं तें सर्व ऐकलं. तो म्हणतो कीं, ' मी तुझ्याकरितां एक लहानशी शाल विकत आणीन. मात्र ती तूं स्वतः पसंत केलेली असली पाहिजे.' त्यानं ती आणली नाहीं तर बरं होईल. अन् ती तर काय, तिनं असा फक्कड पोषाख केला आहे! तिनं मखमलीचा कोट आंगांत घातला आहे अन् फरेंच शाल तिनं आंगावर घेतली आहे.

**अनीशा**:—ती पोरटी तर निर्लज्जच झाली आहे. तिनं सगळी मर्यादा गुंडाळून ठेवली आहे.

**मिट्रिशा**:—अरे बाप, यांत लाज कसलीन् काय? पैसा आहे तोंपर्यंत चैन करायला काय हरकत आहे? देव भलं करो, जेवायची वेळ झालीच नाहीं कां? (अनीशा उत्तर देत नाहीं.) मी तोंपर्यंत जातों व शेकत बसतो. (भट्टीवरच्या माळयावर चढतो,) अरे देवा, देवा!

**शेजारीण**:—(प्रवेश करते) तुमचा तो भला माणूस अद्याप घरीं आलेला दिसत नाहीं.

**अनीशा**:—नाही.

**शेजारीण**:—आतां तो घरीं यावयास पाहिजे होता. तो कदाचित् आपल्या त्या हॉटेलांत तर थांबून राहिला नसेल? माझी बहीण थेकला म्हणते कीं, "गांवांतून आलेल्या किती तरी गाडया तिथं उभ्या होत्या."

**अनीशा**:—नानी, नानी, ऐकूं आलं कां?

**नानी**:—होय, होय.

**अनीशा**:—आतां त्या हॉटेलांत धांवत जा व पहा, दारू पिऊन तो तिथंच कदाचित् गेला असेल.

**नानी**:—(माळयावरून खालीं उडी मारून उतरते व पोषाख करते.) बरं, जातें.

**शेजारीण**:—अन् त्यानें अकुलिनाला बरोबर नेलें आहे!

**अनीशा**:—तसं नसतं तर तो तिकडं गेलाच नसता. तिच्याकरितांच तो अनेक कामें उकरून काढतो. "बँकेला तर गेलंच पाहिजे," तो म्हणतो.

" पैसे घेण्याची मुदत भरली आहे." तो थाप मारतो. परंतु हे सगळे तिचे खेळ आहेत.

**शेजारीणः**—(मान हलविते.) हें कांहीं चांगलं लक्षण नाहीं ( स्तब्धता. )

**नानीः**—( दरवाज्यांतून ) बरं तो तिथं असला तर त्याला काय सांगूं ?

**अनीशाः**—तो तिथं आहे कां येवढंच पाहून ये.

**नानीः**—ठीक आहे. ही मी आतां आलेंच ! (बराच वेळ स्तब्धता. )

**मिट्रिशः**—(ओरडतो) अरे देवा, देवा, दयाळू निकोलस !

**शेजारीणः**—( चमकून ) अं, मला त्यानं अगदीं घाबरून सोडलं ! तो आहे तरी कोण ?

**अनीशाः**—तो तर आमचा गडी मिट्रिश.

**शेजारीणः**—मला त्यानं किती घाबरून सोडलं ! पण मी तर विसरूनच गेलें. अकुलिनाच्या लग्नाची वाटाघाट चालू आहे, हें खरं कां ?

**अनीशाः**—( मागावरून उठते व टेबलाजवळ जाऊन बसते. ) डेडलोवो-हून कोणी तरी एक जण आला होता खरा. पण तें प्रकरण तिथंच थांबलं, असं दिसतं. त्यांनीं हूनच विचारलं होतं पण नंतर त्यानीं कांहीं वास्तपुस्त केली नाहीं. म्हणून तें तितक्यावरच राहिलं. कोण इतकी काळजी घेणार तरी कोण ?

**शेजारीणः**—कोण ते झोवोचे लिझोनोव ?

**अनीशाः**—त्यांनींहि बरीच खटपट केली होती. पण त्याचंहि पुढं कांहीं झालं नाहीं. ते पुन्हां आम्हांला भेटलेहि नाहींत.

**शेजारीणः**—तिचे लग्नाचे दिवस काय अद्याप गेलेले नाहींत !

**अनीशाः**—कां, गेले कां नाहींत ? तिचं लग्न अद्यापपर्यंत होऊन जायला पाहिजे होतं. ती आमच्या घरांतून केव्हां एकदां बाहेर जाईल असं मला झालं आहे; पण अद्याप तें कांहीं जुळत नाहीं. त्याला तें नको आहे अन् तिची तर मुळींच इच्छा नाहीं. तो तर अद्याप भर ज्वानींतच आहे, नाहीं कां ?

**शेजारीण:**—अगबाई, काय एक एक ऐकावं तेवढं थोडंच. काय, तो तर तिचा सावत्र बाप ना ?

**अनीशा:**—गडे, काय सांगावं! त्यांनीं मला अगदीं पूर्णपणें फसविलं आहे. इतकं हातोंहात फसविलं आहे कीं, सांगायची सोय नाहीं. मीच मूर्ख, माझ्या लक्ष्यांतच आलं नाहीं. शंकादेखील आली नाहीं अन् म्हणून मी त्याच्याशीं लग्न केलं. मला कल्पना आली नाहीं पण तीं दोघें परस्पर समजून होतीं.

**शेजारीण:**—किती या भानगडी ?

**अनीशा:**—झालं, हें प्रकरण जास्त जास्त बिघडतच चाललं, अन् तीं दोघं माझ्यापासून कांहीं लपवून ठेवीत आहेत, असं मला दिसूं लागलं. हें सर्व पाहून काय सांगावं, मला तर आपला जीव अगदीं नकोसा झाला आहे. मीं जणूं काय त्याच्यावर प्रेम केलं नाहीं, असंच झालं आहे!

**शेजारीण:**—तें तर सांगायलाच नको.

**अनीशा:**—तो माझ्याशीं असं वागूं लागला ही गोष्ट मला असह्य झाली आहे. काय सांगूं ? माझं काळीज कसं तिळतिळ तुटतं आहे.

**शेजारीण:**—होय, तो तर आतां अगदीं मोकाटच सुटला आहे, असं मी ऐकतें.

**अनीशा:**—अन् त्याचीहि यांत भर पडली आहे. पूर्वीं तो थोडी थोडी घेत असे पण सभ्यपणानं वागत असे. पूर्वीं तो थोडा वाह्यात् वागत असला तरी तो नेहमीं माझ्याशीं प्रेमानें वागे. पण आतां तो माझ्यावरहि संतापूं लागला आहे व मला पायाखालीं तुडवूं पहात आहे. परवां तर त्यानें आपले दोन्ही हात माझ्या केंसांत इतके गुंतवून सोडले कीं मला इकडे तिकडे हलतां येईना! अन् ती पोर तर सापापेक्षां हरामी आहे. पृथ्वी असल्या सटव्यांचा भार कशी वाहते, हेंच आश्चर्य आहे.

**शेजारीण:**—खरंच, गडे तुझ्या स्थितीकडे पाहिलं म्हणजे तुझ्या दुःखाची कल्पना येते. असलं दुःख सहन करायचं म्हणजे कांहीं थट्टा नाहीं. एका भिकाऱ्याला तूं आश्रय दिलास, अन् त्यानं तुला आतां असं नाचायला लावावं अं ? पण याचे लगाम कां तूं खेचीत नाहींस!

**अनीशा:**—हं ! काय सांगूं ? माझी तशी छाती होत नाहीं. तो नुकता वारलेला माझा नवरा कडक होता खरा तथापि त्याला हवा तसा माझ्या मनाला येईल त्याप्रमाणें मी वळवीत होतें. पण याच्या बाबतींत मात्र मी कांहीं करूं शकत नाहीं. त्याला पाहिलं कीं, माझा सगळा राग नाहींसा होतो. त्याच्या समोर माझं कांहीं चालत नाहीं. मला यत्किंचितहि धैर्य होत नाहीं. पाण्यांत बुडवून मारलेल्या कोंबडीप्रमाणें माझी अवस्था होते.

**शेजारीण:**—हं ! गडे तुला मंत्रानं भारून टाकलेली असली पाहिजे. असल्या भानगडी मॅट्रियोना करीत असते असं मीं ऐकलं आहे. तिचंच हें काम असलं पाहिजे.

**अनीशा:**—होय, मला स्वत:लासुद्धां असं केव्हां केव्हां वाटतं. काय सांगूं ? केव्हां केव्हां माझ्या अंत:करणाला किती वेदना होतात म्हणून सांगूं ? त्याचे अगदीं तुकडे तुकडे करून टाकावे असं वाटतं. पण त्याच्यावर माझी नजर गेली कीं, त्याच्याविरुद्ध कांहीं करावं असं माझं मनच मला सांगत नाहीं

**शेजारीण:**—यावरून तुला भारून टाकली आहे, हें तर स्पष्टच दिसत आहे. मनुष्याला बिघडवून टाकायला फारसा वेळ लागत नाहीं. अन् तुझ्याकडे मीं लक्ष्यपूर्वक पाहिलं म्हणजे तुझी काय अवस्था झाली आहे, हें माझ्या तेव्हांच लक्ष्यांत येतं.

**अनीशा:**—होय, मी अगदीं लांबटांगा व किरकोळ झालें आहें. अन् त्या खुळचट अकुलिनाकडे पहा ! ती पोरगी पूर्वीं अगदीं अशीच हडकुळी व गबाळ नव्हती कां, पण आतां पहा ती कशी झाली आहे ! हें सगळं आलं कुठून ? तो तिला हव्या त्या जिनसा पुरवितो. ती आतां इतकी हुशार व लठ्ठी झाली आहे कीं, टिचकी मारली कीं, अंगांतून रक्त फुटून बाहेर निघेल. ती खुळचट आहे हें खरें, पण तिनं आपल्या डोक्यांत काय घेतलं आहे कोणास ठाऊक ! ती म्हणते, "मीच मालकीण आहें, घर माझं आहे व त्याच्याशीं लग्न लावून घ्यावं अशीच बाबांची इच्छा होती." ती इतकी मिस्कील आहे कीं, विचारूं नका. ती कारटी एकदां रागावली म्हणजे घराचं छप्परहि उलथून टाकायला कमी करायची नाहीं.

**शेजारीण:**--खरंच गडे, तूं कसे दिवस काढीत असशील आतां सगळं माझ्या लक्ष्यांत आलं. अन् लोक तर तुझा हेवाच करतात. "त्यांना काय झालंय, ते श्रीमंत आहेत," असं म्हणत असतात. पण सोनं झालं म्हणून काय झालं, डोळ्यांतून निघणारे अश्रू तें थांबवूं शकत नाहीं.

**अनीशा:**--अन् हेवा करण्याजोगं मेलं आहे तरी काय? पैसे म्हणावे तर त्यांची केव्हांच वाट लागेल. काय सांगूं तरी काय, पैसे तर तो अगदीं पाण्यासारखे उधळून टाकीत आहे.

**शेजारीण:**--पण हें असं कसं झालं? तूं इतकी भोळी कशी? सगळे पैसे त्याच्या हातांत देऊन टाकलेस! ते तुझे पैसे आहेत.

**अनीशा:**--तुला तें सगळं माहीत असतं तर तूं असं म्हटलं नसतंस. पण एक गोष्ट खरी कीं, या बाबतींत एक लहानशी चूक झाली.

**शेजारीण:**—जर मी तुझ्याजागीं असतें, तर त्याला थेट कोर्टांत खेंचला असता व पेंचांत आणलं असतं. त्या पैशावर तुझी मालकी आहे. तो उध-ळून टाकतो म्हणजे काय? त्याला असा अधिकार नाहीं!

**अनीशा:**--अलीकडे ते या गोष्टीचा विचारहि करीनासे झाले आहेत.

**शेजारीण:**—होय,मला तर पक्कं कळून चुकलं तुझं मनच दुबळं झाल आहे.

**अनीशा:**--होय, अगदीं दुबळं झालं आहे. त्यानं मला अगदीं पेंचांतच आणलं आहे. मला तर कांहीच समजेनासं झालं आहे. काय करूं? माझं कपाळच फुटकं झालं!

**शेजारीण:**--(कानोसा घेत) कोणी तरी येत आहे असं मला वाटतं. (दरवाजा उघडतो व अकीम प्रवेश करतो.)

**अकीम:**--(क्रॉसचें चिन्ह करतो पायावरील बर्फ झाडून टाकतो व अंगां-तला कोट काढून ठेवतो) देव तुमचं भलं करो. काय, कसं काय आहे? मुली, कसं काय ठीक आहे ना?

**अनीशा**--काय बाबा, ठीक आहे ना? तुम्ही थेट आपल्या घरूनच इकडे आलां?

**अकीम**:--मी बरेच दिवस विचार करीत होतों इकडे यावं अन् भेटावं. काय नांव बरं, हो, माझ्या मुलाला, होय, माझ्या मुलाला भेटावं असा मीं विचार केला होता. घरून लवकर बाहेर पडलों नाहीं. जेवण केलं अन् बाहेर पडलों, काय समजलं ? बर्फ तर इतकं पडत होतं कीं चालणं मोठं मुष्किलीचं झालं. अन् त्यामुळं, काय समजलं, यायला उशीर लागला. अन् तो माझा मुलगा ! घरीं आहे कां ? काय म्हटलं, मुलगा घरीं आहे कां ?

**अनीशा**:--नाहीं. तो शहरांत गेला आहे.

**अकीम**:--(बांकावर बसतो.) त्याच्याशीं माझं कांही काम आहे. समजलं कांहीं काम आहे. मीं त्याला परवां कळविलं होतं. मला थोडी गरज होती. काय समजलं, आमचा घोडा आतां कामांतून गेला आहे. समजलं ? आमचा घोडा आतां कामांतून गेला आहे म्हणून आतां आम्हांला, काय समजलं, घोडा घेतलाच पाहिजे. माझं म्हणणं असं कीं, एकादा घोडा घेतलाच पाहिजे. म्हणून मी इकडे आलों. आलं ना ध्यानांत ?

**अनीशा**:--निकिटा सांगत होता खरं. तो घरीं परत आला म्हणजे त्याच्याशी बोला. ( भट्टीकडे जाते. ) आतां थोडं जेवून घ्या. तो आतां येईल. मिट्रिश, ए मिट्रिश, चल जेवून घे.

**मिट्रिश**:--देवा, देवा, कृपा कर बाबा !

**अनीशा**:--चला, जेवायला चला.

**शेजारीण**:--मी जातें आतां. ( जाते. )

**मिट्रिश**:--(माळ्यावरून खालीं येतो.) मला कशी इतकी झोंप लागली हें माझ्या लक्ष्यांतच आलं नाही. काय अकीमदादा, कसं आहे !

**अकीम**:---हां ! मिट्रिश, तूं इथं काय करतोस ? काय म्हटलं इथं काय काम करतोस ?

**मिट्रिश**:--कां, तुमचा मुलगा निकिटा, याच्या घरीं मी नोकरीला आहें.

**अकीम**:--काय म्हणतोस ! माझ्या मुलाची नोकरी करतोस?

**मिट्रिशः**--शहरांत एका व्यापाऱ्याजवळ रहात होतों पण तिथं जें काय मिळवलं तें सर्व दारू पिऊन उडवून टाकलं. आतां मी पुन्हां आपला खेड्यांत आलों आहें. घरदार कांहीं नाही. तेव्हां नोकरी पत्करली. (जांभई देतो.) देवा, देवा! त्याला कसं हांक मारतां, काय त्याचं नांव? निकिटा! त्याचं.

**अकीम**--पण कसं काय, कसं काय चाललं आहे। तो कसा काय वागतो? त्यानं कांहीं दुसरा उद्योग पत्करला आहे, रोजंदारीवर मजूर ठेवायला? काय म्हटलं, त्यानं दुसरा कसला धंदा सुरू केला आहे?

**अनीशा:** – तो कसला धंदा करणार? तो सगळी व्यवस्था पहात होता. पण आतां त्याचं मन दुसरीकडंच लागलं आहे. तेव्हां त्यानं रोजंदारीवर मजूर लावला आहे.

**मिट्रिशः**--कां? त्यानं तसं कां करूं नये? त्याच्याजवळ जर पैसा आहे तर त्यानं तसं कां करूं नये?

**अकीमः**--असं करणं चुकीचं आहे. काय समजलं? अगदी चुकीचं आहे. असं करणं म्हणजे स्वतःला भ्रष्ट करून घेण्यासारखं आहे.

**अनीशा:**--होय, तो भ्रष्ट झालाच आहे. खरोखरी हें अत्यंत भयंकर आहे.

**अकीमः**--पाहिलं, मनुष्य एकाद्याचं भलं करायला जातो अन् त्याचा असा हा भलताच अनिष्ट परिणाम होऊन बसतो. संपत्ति माणसाला भ्रष्ट करून टाकते. काय समजलं? भ्रष्ट करून टाकते.

**मिट्रिशः**--पैसे असल्यावर काय कुत्रं सुद्धां पिसाळून जातं. चैनीची राहणी कुणाला भ्रष्ट करून टाकणार नाही? माझं स्वतःचंच उदाहरण पहा ना! मी किती चैनीत दिवस घालविले? एकदां तर तीन आठवडे सारखा दारू पीत होतों. अन् येवढ्या वेळांत एकदां सुद्धां शुद्धीवर आलों नव्हतों. माझ्याजवळ राहिलेली शेवटची विजार विकूनहि मी दारू प्यालों. जेव्हां माझ्याजवळ कांही राहिलेंच नाहीं तेव्हां मी प्यायचें सोडून दिलं. आतां यापुढें दारू प्यायची नाहीं, असा निश्चयच केला आहे. मरूं दे, तिचं नांव देखील आतां नको.

**अकीमः**--अन् ती तुझी म्हातारी कुठं आहे?

**मिट्रिश**:—माझी म्हातारी बायको ना? ती शहरांत अशीच दारूच्या गुत्त्याभोंवतीं फिरत असते. तिच्या अंगावर सूजहि आली आहे. तिचा एक डोळा तर गेलाच व दुसराहि त्याच पंथांत आहे. अन् तिचं तोंड तर एका बाजूला वांकडं झालं आहे. शुद्धीवर अशी ती कधीं नसतेच. जाऊं दे, मरूं दे तिला !

**अकीम**:—अरे रे, हें असं कसं झालं ?

**मिट्रिश**:—अन् शिपायाच्या बायकोचं दुसरं काय व्हायचं ? ती जाणार कुठं? तिचं अगदीं जें व्हायचं तेंच झालं. (स्तब्ध राहतो. )

**अकीम**:—(अनीशाला उद्देशून) अन् निकिटाचं काय ? शहरांत जाताना त्यानं आपल्याबरोबर कांहीं घेतलं आहे काय ? म्हटलं विक्रीकरितां त्यानं कांहीं नेलं आहे कां ?

**अनीशा**:—( टेबलावर ताटें मांडीत व वाढीत असतांना ) नाहीं, त्यानं कांही नेलं नाहीं. तो बँकेंतून पैसे काढून आणण्याकरितां गेला आहे.

**अकीम**:—( जेवायला बसतां बसतां ) कां ? ते पैसे दुसऱ्या कोणत्या तरी धंद्यांत घालण्याची तुमची इच्छा आहे ?

**अनीशा**:— नाहीं, त्याला आम्ही हातहि लावीत नाहीं. फक्त २५।३० रूबल व्याजाची मुदत भरली कीं, आम्ही आणतों. ते तर घेतलेच पाहिजेत.

**अकिम**:—घेतले पाहिजेत ? कां घेतले पाहिजेत ? आज थोडे घ्याल, उद्यां थोडे घ्याल, अन् माझं काय म्हणणं, असं करून सगळेच पैसे काढून घ्याल

**अनीशा**:—मुदलाशिवाय बाकीचे व्याज म्हणून आम्हांला हे मिळतात. बाकी सर्व पैसे सुरक्षित आहेत.

**अकीम**:—सर्व सुरक्षित आहेत ? हें असं कसं ? सुरक्षित कसे आहेत ? तुम्ही तर काढून आणतां अन् काय म्हणे सगळे सुरक्षित आहेत ! हें कसं होईल ? तुम्ही कणगींत धान्य ठेवतां. अन् सारखं काढून घेत असतां. असं केल्यावर तें सर्व सुरक्षित कसं राहील ? असं असेल तर त्यांत कांहीं लबाडी असली पाहिजे. यांत काय लबाडी आहे, तें पाहिलं पाहिजे नाहीं तर फसाल

बरं! माझं म्हणणं असं कीं, तुम्ही काढून घेतां अन् सगळं सुरक्षित आहे म्हणतां हें कसं काय? मला समजत नाहीं.

**अनीशाः**—मला त्यांतलं कांहीं समजत नाहीं. इव्हेन मोसेश आम्हांला तसा सल्ला देतो. "बँकेंत पैसा ठेवा," असं तो म्हणाला. "पैसा सुरक्षित राहील अन् तुम्हांला व्याज मिळेल," तो म्हणाला.

**मिट्रिशः**—( जेवण आटोपून ) असंच असतं. मी एका व्यापाऱ्यापाशीं राहिलों होतों. ते सर्व असंच करतात. बँकेंत पैसे ठेवतात अन् माळघावर खुशाल निजून राहतात अन् पैसा घरांत येतच असतो.

**अकीमः**—हें तर विचित्रच आहे! काय म्हणालां? घरांत पैसे येतात? ते कसे येतात? ते त्यांना कुणाकडून मिळतात? काय म्हटलं, ते पैसे त्यांना कोठून मिळतात?

**अनीशाः**—बँकेंतून ते पैसे काढून आणतात.

**मिट्रिशः**—चालू दे! ही गोष्ट बायकांना समजायची नाहीं. हें पहा, मी ती तुम्हांला नीट समजेल अशी सांगतों. ऐका नीट, लक्ष्यांत घ्या. समजा, तुमच्याजवळ कांहीं पैसा आहे. अन् उदाहरणार्थ, मला तो पाहिजे आहे. वसंत ऋतु सुरू झाला आहे. माझी जमीन मोकळी पडली आहे. माझ्याजवळ बीं नाहीं. मला सारा भरायचा आहे. मग हें पहा, मी तुमच्याकडे येतों. "अकीम," मी म्हणतों, "दहा रूबलची नोट द्या अन् रास झाल्यानंतर मी ती परत करीन व माझ्यावर तुम्हीं उपकार केलेत म्हणून मी तुमचे दोन एकर नांगरून देईन." अन् तुम्ही माझ्यापाशीं घोडा, गाय वगैरे आहे असं पाहतां. तुम्ही म्हणतां, "नाही, तसं नाहीं, या उपकाराबद्दल दोन किंवा तीन रूबल अधिक द्या." झालं व्यवहार पुरा होतो. मी तर चिखलांतच रुतलेला असतो. पैसा घेतल्याशिवाय तर मला निर्वाहच नसतो. मग मी म्हणतों, "ठीक आहे." मी ती दहा रूबलची नोट घेतों. रास झाल्यावर मी ते पैसे परत आणतों अन् जादा तीन रूबल तुम्ही माझ्यापासून पिळून घेतां.

**अकीमः**—होय, सावकार शेतकरी असं करतात, पण परमेश्वराला ते विसरतात. त्याच वेळीं त्यांना असं करण्याची बुद्धि होते. यांत प्रामाणिकपणाहि नाहीं किंवा कोणाचें हितहि नाही.

**मिट्रिशः**—थोडं माझं ऐकून घ्याना ! कांहीं झालं तरी त्याचा परिणाम तोच होतो. आतां तुम्हीं माझी कातडी कशी कशीं सोलली आहे तें विसरूं नका. समजा, अनीशापाशीं कांहीं पैसा आहे व तो तसाच पडून राहिला आहे. या पैशाचं काय करावं, हें तिला समजत नाहीं. शिवाय ती पडली बायको. पैशाचा उपयोग कसा करावा, हें तिला माहीत नाहीं. ती तुमच्याकडे येते. "या माझ्या पैशाचाहि उपयोग करून तुम्ही कांहीं नफा नाहीं कां मिळवूं शकणार ?" ती म्हणते. "कां नाहीं करूं शकणार ?" तुम्ही तिला सांगतां व प्रसंगाची वाट पहात राहतां. उन्हाळ्यापूर्वीं मी पुन्हां तुमच्याकडे येतों अन् म्हणतों, "मला आणखी दहा रूबल द्या; तुमचे फार उपकार होतील." माझं कातडं सगळंच झिजून गेलेलं नाहीं, अद्याप मला सोलतां येईल असं तुम्हांला आढळून येईल तर तुम्ही अनीशाचे पैसे मला देतां. पण समजा, मी अगदीं पूर्णपणें भादरला गेलों आहें, मजजवळ खायलाहि कांहीं नाहीं---तर माझ्यापासून कांहींच निष्पन्न होणार नाहीं असें पाहून तुम्ही मला जायला सांगतां. अन् तुम्ही दुसरा मनुष्य पाहतां. त्याला तुमचे व अनीशाचे दोघांचेहि पैसे देतां अन् त्याला सोलून काढतां. बँक म्हणजे हेंच. बँकेचा व्यवहार असाच असतो. असा हा व्यवहार सारखा हातोंहात भ्रमण करीत असतो. याप्रमाणं ही गोष्ट अगदीं बोधक आहे. समजलं म्हातारे बाबा !

**अकीमः**—( प्रक्षुब्ध होऊन ) ती कशीहि असो. ती, काय समजलं ? घाणेरडी गोष्ट आहे. पैसेवाले शेतकरी असं करतात. त्यांनाहि आपण काय करीत आहों हें माहीत असतं, आपण हे पाप करीत आहों असं त्यांनाहि माहीत असतं. हें खरोखर न्यायाचं नाहीं, काय समजलं ? हें कृत्य गैरशिस्त आहे. घाणेरडं आहे. चांगले शिकलेले लोक असं कसं करूं शकतात ? काय समजलं ?

**मिट्रिशः**--म्हातारे बाबा, असं करण्यालाच ते संवकलेले असतात. अन् लक्ष्यांत ठेवा, मूर्ख, खुळचट अथवा बायका, ज्यांना पैसा कशांत घालावा, हें कळत नाहीं, ज्यांना येवढी अक्कल नाहीं, असलीं माणसें बँकेकडे जातात. अन् त्या ठिकाणी हे शहाणे लोक या पैशावर हात मारतात, त्याच्या जोरावर ते लोकांना सोलून काढतात. ही गोष्ट मनाला अगदीं जाचणारी आहे.

**अकीमः**--(सुस्कारे टाकीत) पाहिलं, पैशाशिवाय राहणं वाईट अन जवळ पैसा असणं हें त्याच्याहून वाईट! हें कसं काय? ईश्वराची आज्ञा अशी कीं, आम्हीं काम करावं. परंतु तुम्ही, काय म्हटलं, तुम्ही आपला पैसा बँकेंत टाकतां व झोंपीं जातां. अन् हा पैसा तुम्ही घरांत लोळत राहिलेले असलां तरी तुमचें पोषण करीत असतो. ही गोष्ट घाणेरडी आहे. माझं तर असं म्हणणं कीं, हें रास्त नाहीं.

**मिट्रिशः**--रास्त नाहीं म्हणे, अहो, म्हातारे बाबा, असल्या गोष्टींची अलीकडे कोण काळजी घेतो? अन् तुम्हांला ते कसं बेमालूमपणें नागवतात पहा! त्यांतलं खरं रहस्य हेंच आहे.

**अकीमः**--( सुस्कारे टाकतो. ) होय, खरं आहे. वेळ भरत आली आहे! काय समजलं? वेळ भरत आली आहे, हेंच खरं. मी शहरांतल्या घरांकडे पाहतों–जिकडं तिकडं गुळगुळीत व सफाईदार! ही सर्व चैन कशाकरितां? यापासून कोणाचें हित होणार आहे? अरे, रे, लोक देवाला विसरून गेले. काय म्हटलं, अगदीं विसरून गेले. आम्ही ईश्वराला विसरलों आहों, विसरलों आहों. बस नमस्कार! मीं आतांपर्यंत पुष्कळ पाहिलं, माझं अगदीं पोट भरलं आहे. ( उठतो. मिट्रिश माळ्यावर चढून जातो. )

**अनीशाः**--( जेवते व ताटें गोळा करते. ) त्याच्या बापानं जर त्याची खरडपट्टी काढली तर फार चांगलं होईल. पण त्याला तसं सांगावं कसं? मला तर शरम वाटते.

**अकीमः**—काय म्हणतेस?

**अनीशाः**--हो, कांहीं नाहीं.

[नानी प्रवेश करते.]

**अकीमः**—कशी चांगली पोर आहे. सारा वेळ कामांत असते ! तुला थंडी वाजते आहे असं दिसतं.

**नानीः**—होय, फारच थंडी वाजते काहे. आजोबा, बरं आहे ना ?

**अनीशा**:—बरं, तो तिथं आहे कां ?

**नानीः**—नाहीं, पण अंद्रियान तिथं आहे. तो शहरांत गेला होता. तो म्हणत होता कीं मीं त्याला शहरांतल्या एका हॉटेलांत पाहिलं. तो म्हणतो कीं, दादांनीं खूब झोंकली आहे, अगदीं बेसुमार दारू झोंकली आहे.

**अनीशा**:—तुला जेवायचं आहे ना ! बैस, जेवायला बैस.

**नानीः**—( भट्टीजवळ जाते. ) किती थंडी आहे. माझे हात कसे अगदीं गारठून गेले आहेत. ( अकीम आपल्या पायाला बांधलेल्या पट्ट्या सोडतो व बूट काढून ठेवतो. )

**अनीशा**:—बाबा !

**अकीमः**—काय, तुझं काय म्हणणं ?

**अनीशा**:—अन् मरीनाचं ठीक चाललं आहे ना !

**अकीमः**—होय, तिचं ठीक चाललं आहे. ती छोटी पोर, काय म्हणशील, चांगली हुशार व स्थिर मनाची आहे. तिचं चांगलं चाललं आहे. ती चांगली मेहनती आहे आज्ञाधारक आहे. तिचं फार चांगलं चाललं आहे, काय समजलं, चांगलं चाललं आहे.

**अनीशा**:—अन् मरीनाच्या नवऱ्याचा कुणी नातेवाईक अकुलिनाबरोबर लग्न करण्याच्या विचारांत आहे, ही चर्चा तुमच्या गांवांत चालू आहे. तुमच्या कानावर ही गोष्ट नाहीं कां आली ?

**अकीमः**—हां ! तो मिरॉनॉफ नाहीं कां ? होय. बायकाबायकांत कांहीं गप्पा चालल्या होत्या खऱ्या. पण मीं तिकडं लक्ष्य दिलं नाहीं. मला कांहीं माहीत नाहीं. होय, त्या म्हाताऱ्या बाया असंच कांहीं तरी म्हणत होत्या खऱ्या. पण माझी स्मरणशक्ति आतां कमी झाली आहे. मिरॉनॉफचें घराणें ना ? चांगलेंच आहे.

**अनीशाः**---हें लग्न ठरून गेलं तर बरं होईल, असं मला झालं आहे. मी अगदीं उतावीळ झाल्यें आहें.

**अकीमः**---अन्, कां बरं ?

**नानीः**---( ऐकते. ) ते आले वाटतं !

**अनीशाः**---बरं झालं. तुला त्यांच्याशीं काय करायचं आहे ! ( चमचे धुण्याचें काम चालू ठेवते. मागें वळूनहि पहात नाहीं. )

**निकिटाः**---( प्रवेश करतो. ) अनीशा ! अग ए ! कोण आलं आहे ! ( अनीशा वर पाहते व कांहीं न बोलतां मान वळविते. )

**निकिटाः**---( जोरानें ) कोण आलं आहे ! कां विसरलीस वाटतं !

**अनीशाः**---नको उगीच बडबड करूं नकोस ! चल आंत ये !

**निकिटाः**---( आणखी अधिक जोरानें ) कोण आलं आहे ?

**अनीशाः**---(जाते व त्याचा हात धरते.) बरं मग, आपण आलां आहां. नवरोजी आलां आहां ! मग आंत चला ना !

**निकिटाः**---( मागें सरतो. ) हां ! असं पाहिजे ! नवरा ! अन् तुझ्या नवऱ्याला काय म्हणतात ? बोल, नीट बोल !

**अनीशाः**---जळलं मेलं ! निकिटा !

**निकिटाः**---कां रीतभात नाहीं कां ? पूर्ण नांव काय ?

**अनीशाः**---निकिटा अकिमिश. बरं मग !

**निकिटाः**---( अद्याप दारांतच असतो. ) हां, असं ! मग आतां आडनांव !

**अनीशाः**---( हंसते व हात धरून त्याला ओढते. ) शिलिकिन ! काय ही दशा झाली आहे !

**निकिटाः**---हां ! असं पाहिजे. ( दाराच्या चौकटीला धरतो. ) नाहीं. आतां असं सांग कीं, शिलिकिननं घरांत शिरतांना कोणतं पाऊल प्रथम आंत टाकावं.

**अनीशाः**---बस, पुरें झालं. तुझ्या अशा करण्यामुळं थंडी मात्र घरांत शिरत आहे.

**निकिटा**:—सांग, कोणतं पाऊल आंत टाकावं ? तुला सांगितलंच पाहिजे. तें कांहीं चुकायचं नाहीं.

**अनीशा**:—(स्वगत) तो असाच त्रास देत राहील. (निकिटाला उद्देशून) बरं तर डावं पाऊल आंत टाक. चल आंत ये.

**निकिटा**:—बस, असं पाहिजे.

**अनीशा**:—घरांत कोण आलं आहे तुला दिसतंय कां ?

**निकिटा**:—हां. माझे बाबा ! बरं मग त्याचं काय ? माझ्या बापाबद्दल मला शरम वाटायचं कारण नाहीं. मी त्यांचा मान राखूं शकतों. काय कसं बाबा ? (नमस्कार करतो व हात पुढं करतो.) नमस्कार, बाबा, नमस्कार !

**अकीम**:—(उत्तर देत नाहीं.) दारू, मला वाटतं दारू ! तिचे काय परिणाम होतात, हें मला माहीत आहे. अगदी घाण बरं ?

**निकिटा**:—दारू ! होय, मग त्यांत काय झालं ! मी दारू पीत होतों. मलाच दोष कां ? खूब झाली ! मीं आपल्या स्नेह्याबरोबर एक गलास घेतला व त्याचें आरोग्य चिंतिलें !

**अनीशा**:—जा, अन् निजून रहा. मी काय सांगतें ?

**निकिटा**:—ए बया, सांग बरं, मी कुठं उभा आहे ?

**अनीशा**:—जा, नीज जा, मी काय सांगतें लक्ष्यांत आलं ना ?

**निकिटा**:—ए, अग ए, सांग पाहूं मी कुठं उभा आहे.

**अनीशा**:—बस पुरें, ठीक आहे. जा, नीज जा बघूं !

**निकिटा**:—मी आपल्या बाबांच्या बरोबर अगोदर चहा पीन. जा, आधीं आधण ठेव. अकुलिना, मी काय सांगतों ? इकडं ये पाहूं.

[ अकुलिना प्रवेश करते. तिनं झोंकांत पोषाख केलेला असतो. आंत येतांना बाजारांत घेतलेल्या जिनसा ती आंत घेऊन येते.]

**अकुलिना**:—सगळ्या जिनसा तूं इकडंतिकडं कां फेंकून दिल्यास ? तें सूत कुठं आहे ?

**निकिटा**:—काय सूत ? तें तिथं आहे. ओहो, मिट्रिश, तूं आहेस कुठं ? बस्स, अगदीं सारखा निजून रहा. झोंप ? झोंप ? जा, अन् घोडा तयार कर.

**अकीमः**—( अकुलिनाकडे पहात नाहीं. आपल्या मुलाकडेच त्याचें लक्ष्य असतें. ) काय म्हणतोस ? तो काय करीत आहे ? तो म्हातारा तर आतां कामांतून गेला आहे. तो पिकाची झाडणी करतो, त्याच्याकडे तूं पहातोस तरी कसा ? मोठ्या दिमाखानें पाहतोस नाहीं का ? म्हणे, घोडा तयार कर. फूः फूः, सगळीच घाण !

**मिट्रिशः**—( माळ्यावरून खालीं उतरतो व बूट चढवितो. ) अरे, देवा, देवा, घोडा परसांत आहे कां ! मरूं दे त्याला ! पहा त्यानं कशी अगदीं ठांसून दिली आहे ! अगदीं ओ येईपर्यंत ठांसून दिली आहे. अरे देवा, देवा ! ( मेंढीचें कातडें पांघरतो व बाहेर जातो )

**निकिटाः**—(खालीं बसतो.) बाबा, तुम्हीं मला क्षमा केली पाहिजे. मीं थोडी दारू घेतली हें खरें; पण त्याचं काय मोठंसं? काय, कोंबडी देखील दारू घेईल ! कां खरं नाहीं कां ? तुम्हीं मला क्षमा केलीच पाहिजे. मिट्रिशकडे लक्ष्य देऊं नका. त्याला कांहीं त्याची फिकीर नाही. तो घोड्याला तयार करील.

**अनीशाः**—खरंच आधण ठेवूं कां ?

**निकिटाः**—ठेव. माझे बाबा माझ्या घरीं आले आहेत. मला त्यांच्याशीं बोलायचं आहे. अन् त्यांच्याबरोबर चहाहि घ्यायचा आहे. ( अकुलिनाला उद्देशून ) कां, सगळीं पार्सलं आंत आणलींस कां !

**अकुलिनाः**—पार्सलं ना ? माझीं मीं आणलीं. बाकीची गाडीतच पडून आहेत. इश्शं हें घे, हें माझं नाहीं.

[ पार्सल टेबलावर टाकते व इतर पार्सलें पेटींत भरते. असें करीत असतांना नानी तिच्याकडे पहात असते. अकीम आपल्या मुलाकडे पहात नाहीं पण पायाला बांधण्याच्या पट्टया व बूट माळ्यावर ठेवतो. ]

**अनीशाः**—(सामोवार* बाहेर घेऊन जात असतां) तिची पेटी तर अगदीं गच्च भरून गेली आहे. तरी पण आणखी कांहीं जिनसा त्यानं तिला विकत घेऊन दिल्यास आहेत.

---

* चहा वगैरेकरितां आधणाचें पाणी तयार ठेवण्याकरितां उपयोगांत आणीत असलेलें भांडें.

**निकिटा:**—(आपण शुद्धीवर असल्याचें सोंग करून) बाबा, तुम्ही माझ्यावर रागावतां कामा नये. तुम्हांला वाटतें मी प्यायलों आहे? मी तिथं गेलों होतों, हें खरें आहे! लोक म्हणतात कीं, 'प्यावं, पण आपलं डोकं मात्र बहकूं देतां कामा नये.' बाबा, पहा मी तुमच्याशीं ताबडतोब बोलूं शकतों. कोणतेंहि काम मी हातांत घेऊं शकतों. तुम्ही माझ्याशीं पैशाबद्दल बोललां होतां. तुमचा घोडा थकून गेला.—हो, मला आठवतें! त्याची सगळी व्यवस्था करतां येईल. तें सर्व आपल्या हातांत आहे. याकरितां एकादी मोठीच रक्कम लागत असती तर गोष्ट वेगळी होती. मग आपल्याला थांबून रहावं लागलं असतं, परंतु तसं कांहीं नाहीं. आपल्याला हें काम करून टाकतां येण्यासारखं आहे.

**अकीम:**—(पायाच्या पट्टयांशीं चुळबूळ करीत) हें बघ पोरा, बर्फ पडूं लागल्यानंतर स्लेजमधून* जाणें चुकीचें आहे.

**निकिटा:**—तुम्ही काय बोलतां तरी काय? "ज्यानं दारू झोंकली आहे, त्याच्याशीं बोलणंहि चुकीचं आहे," असंच तुमचं म्हणणं ना? पण तें जाऊं दे. आतां आपण थोडा चहा घेऊं. मी काय वाटेल तें करूं शकतों. सगळं कांहीं व्यवस्थित मी करूं शकतों.

**अकीम:**—( डोकें हलवीत ) हो, हो, हो!

**निकिटा:**—पैसेच ना? हे इथं आहेत. (खिशांत हात घालतो. नोटबुक बाहेर काढतो. त्यांत असलेल्या नोटा चाळतो आणि दहा रूबलची नोट वेगळी काढतो.) घोडा घेण्याकरितां ही नोट घ्या. मी आपल्या बाबांना विसरूं शकत नाहीं. मी त्यांना सोडूं शकत नाहीं. हें तर स्पष्टच आहे. कारण ते माझे बाबा आहेत! घ्या, हे घ्या ना! खरंच सांगतों, मी अगदीं खुषीनें देत आहें. ( येतो आणि अकीमपुढें ती नोट करतो. अकीम ती घेत नाहीं. ) घ्या ना! मी काय सांगतों. घ्या ना! मी मोठ्या खुषीनें ही नोट देत आहें.

---

* बर्फावरून घसरत जाणारी बिनचाकी गाडी.

**अकीमः**—मी ती घेऊं शकत नाहीं. काय म्हटलं ? मी ती घेऊं शकत नाहीं, अन् तुझ्याशीं मी बोलूंहि शकत नाहीं. काय म्हटलं ? कारण आपण कोण आहों याची शुद्धच तुला राहिलेली नाहीं.

**निकिटाः**—मी तुम्हांला जाऊंच देणार नाहीं ! घ्या, ही घ्या ! ( अकीमच्या हातांत पैसे ठेवतो. )

**अनीशाः**—( प्रवेश करते व थांबते. ) तुम्हीं ते घेतले तर बरें होईल. तो तुम्हांला स्वस्थ बसूं देणार नाहीं.

**अकीमः**—( घेतो व डोकें हलवितो. ) हो, हो ! दारू ! आतां तो मनुष्य राहिलेला नाहीं.

**निकिटाः**—छान ! तुम्हांला परत करतां आले तर परत करा. नाहीं आले तर मी कांहीं त्याची पर्वा करणार नाहीं. मी आपला असा मनुष्य आहें. ( अकुलिनाकडे पाहतो. ) अकुलिना, तुला मिळालेल्या देणग्या दाखीव पाहूं !

**अकुलिनाः**—काय ?

**निकिटाः**—तुझ्या देणग्या दाखीव ना !

**अकुलिनाः**—देणग्या ! त्या दाखवून काय करायच्या ? मीं त्या केव्हांच आंत ठेवून टाकल्या.

**निकिटाः**—आण, त्या इकडे घेऊन ये. मी काय सांगतों ? त्या देणग्या नानी मोठ्या आवडीनं पाहील. उलगड ती शाल अन् इकडं दे पाहूं !

**अकीमः**—हो, हो ! आपल्याला हें सर्व पाहवत नाहीं. ( माळ्यावर चढतो. )

**अकुलिनाः**—( पेटींतून सर्व पार्सलें बाहेर काढते व टेबलावर ठेवते. ) बरं, या त्या सर्व देणग्या. पण यांच्याकडे पाहून करायचंय काय ?

**नानीः**—किती सुंदर आहे ! अगदीं स्टिपेंडाच्यासारखी आहे !

**अकुलिनाः**—काय, स्टिपेंडाच्यासारखी ? स्टिपेंडाच्या शालीची इच्यापुढें काय सर ! ( पार्सल सोडूं लागते. ) हें पहा, याचा वाण तरी पहा ! ही फरेंच जातीची आहे.

**मानी:**--याच्यावरची खडी तर सुरेखच आहे. मेरीचाहि ड्रेस असाच आहे, पण त्याचं अंग निळं आहे व वरची खडीहि फिकी आहे. हें तर फारच सुंदर आहे.

**निकिटा:**--हां ! असं पाहिजे.

[ अनीशा रागारागानें खोलींत जाते व टेबलक्लॉथ व सामोवार परत घेऊन येते आणि टेबलाजवळ जाते. ]

**अनीशा:**--हें आहे काय, टेबलावर हें काय पसरलंय ?

**निकिटा:**--पहा तर खरी !

**अनीशा:**--काय, पहायचंय काय त्यांत ? मीं काय असल्या जिनसा कधीं पाहिल्या नाहींत ? चल काढून टाक. ( आपल्या हातानें शाल खालीं काढून टाकते. )

**अकुलिना:**--कां, अशी खालीं कां काढून टाकीत आहेस ? तुझ्या जिनसा फार तर काढून टाक. (शाल उचलून हातांत घेते.)

**निकिटा:**--अनीशा, पाहिलंस कां ?

**अनीशा:**--काय, मला काय पहायचंय ?

**निकिटा:**--तुला वाटतंय, मी तुला विसरलों आहें ? हें पहा ! (तिला एक पार्सल दाखवितो व तें खालीं ठेवून त्याच्यावर बसतो.) हें तुझ्याकरिता बक्षीस म्हणून आणलं आहे. फक्त तूं तें मिळवलं पाहिजेस. अग ए ! मी कशावर बसलों आहें, सांग पाहूं.

**अनीशा:**--बस्स, चेष्टा पुरे कर. आतां मला तुझी कांही भीति वाटत नाहीं. कुणाच्या पैशावर तूं चैन चालविली आहेस ? अन् या तुझ्या ढोणगी-करितां जिनसा विकत घेत आहेस ? हे पैसे माझेच ना ?

**अकुलिना:**--तुझे ! खरंच. म्हणे मला भीति वाटत नाहीं. ते पैसे तूं चोरणार होतीस पण तें साधलं नाहीं ! चल इथून बाजूला हो. ( तिला बाजूला ढकलून देते.)

**अनीशा:**--तूं अशी ढकलाढकली कां चालविली आहेस ? ढकलाढकली कशी करायची, हें तुला मीच शिकवितें.

**अकुलिना:**--बरं, ढकल पाहूं ! तसं करून तर पहा ! (अनीशाच्या अंगाशीं लगट करते.)

**निकिटा:**--झालं, झालं, तुम्ही बायका म्हणजे काय कराल अन् काय नाहीं. बस्स, आतां झालं ना ? (त्यांच्यामध्यें जाऊन उभा राहतो.)

**अकुलिना:**--मोठी ढकलाढकली करायला निघाली ! तोंड पहा ! मुकाट्यानं गप्प बस व आपण काय काय कर्म केलीं त्यांची आठवण कर ! तुला वाटतं दुसरं कुणाला माहीतच नाहीं !

**अनीशा:**--माहीत आहे, काय माहीत आहे ? चल हो बाजूला. काय, माहीत काय आहे ?

**अकुलिना:**--तुझी एक गोष्ट मला माहीत आहे !

**अनीशा:**--दुसऱ्याच्या नवऱ्याबरोबर जाणारी तूं तर ढालगज भवानीच आहेस.

**अकुलिना:**--अन् तूं काय केलंस, तूं तर आपल्या नवऱ्याला ठारच मारलंस.

**अनीशा**--(अकुलिनाच्या अंगावर धांवून) पिसाळल्याप्रमाणं अशी कां बडबडत आहेस ?

**निकिटा:**--(तिला मागें ओढून) अनीशा, तूं विसरलीस वाटतें ?

**अनीशा:**--काय, धमकी देतोस वाटतं ? तुझी मला कांऽऽहीं भीति वाटत नाहीं.

**निकिटा:**--(अनीशाला मागें ओढतो व तिला बाहेर ढकलूं लागतो.) चल, चालती हो.

**अनीशा:**--कां, कुठं ? जाऊं कुठं ? मी आपल्या घरांतून बाहेर जाणार नाहीं.

**निकिटा:**--चल, चालती हो. मी काय सांगतों ? पुन्हां आंत पाऊल घाल तर खरं !

**अनीशाः**—मी जाणार नाहीं. (निकिटा तिला ढकलून देतो. अनीशा रडूं लागते व किंकाळया फोडते व दरवाजाला धरून लोंबकळूं लागते ) काय ! माझ्या घरांतून मला बाहेर घालवून देणार होय ? मानगुटीला हात घालून मला बाहेर घालून देणार काय ? तूं काय करतोस तुला माहीत आहे ? बदमाष कुठला ! तुला काय वाटतं, तुला कुणी विचारणार नाहीं ? कायदा आपल्याला कांहीं करूं शकणार नाहीं, असं तुला वाटतं होय ? थांब, तुला दाखवितेंच !

**निकिटा**:—असं कां !

**अनीशाः**—मी पाटलाकडे जाईन ! पोलिसकडे वर्दी देईन !

**निकिटा**:—चल, चालती हो इथून ! (तिला बाहेर घालवितो.)

**अनीशाः**:—(दाराबाहेर जाऊन) मी गळफांस लावून जीव देईन.

**निकिटा**:—कांहीं हरकत नाहीं. कोणी भीत नाहीं.

**नानी**:—ओ ऽ ऽ ऽ ओ ! आई, आई ! ( रडूं लागते. )

**निकिटाः**—तिच्या धमक्यांना मी भिणार ! कधींच शक्य नाहीं. कां, तूं रडतेस कशाला ? ती परत येणार नाहीं ना ? कांहीं धास्ती नाहीं ! जा, तो सामोवार घेऊन ये. ( नानी जाते. )

**अकुलिनाः**—( आपल्या सगळ्या बक्षिसाच्या जिनसा गोळा करते. ) हलकट रांड, तिनं कसं अगदीं कवटाळ रचलं आहे. पण लक्ष्यांत ठेव म्हणावं तिची अशी खोडकी जिरवितें कीं, ज्याचं नांव तें. तिला एकदां हात दाखवितेंच.

**निकिटा**:—तिला बाहेर घालवून दिलं ना ? मग यापेक्षां तुला जास्त काय पाहिजे ?

**अकुलिनाः**—तिनं माझी नवी शाल मळवून टाकली. ती कुत्री जर बाहेर गेली नसती तर तिचे डोळेच मीं भोंसकून बाहेर काढले असते.

**निकिटा**:—बस, पुष्कळ झालं. तुला रागवायचं कारण काय ? आतां मीं तिच्यावर प्रेम केलं तर ....

**अकुलिना**:--तिच्यावर प्रेम केलं तर! अगदीं प्रेम करायला योग्यच कीं नाहीं! लठ्ठी कुठली! तूं तिला सोडून दिलं असतंस तरी चाललं असतं. कांहीं बिघडलं नसतं. मेली कुठंहि गेली असती. अन् घर माझंच होतं अन् पैसाहि माझाच होता. म्हणे, मी घरांतील मालकीण. कसली मालकीण! ती आपल्या नवऱ्याशीं कशी वागली पहा! ती खुनी आहे. ती तुझ्याशींहि असंच वागेल.

**निकिटा**:—बायकांचं तोंड एकदां सुटलं म्हणजे तें आंवरणं कठिण! तूं काय बडबडत आहेस, हें तुझं तुला समजतंय कां!

**अकुलिना**--होय, समजतं. मी तिच्याबरोबर राहणार नाहीं, तिला मी घराबाहेर घालवून देईन. माझ्याजवळ तर तिनं राहणंच शक्य नाहीं मोठी मालकीण आली! मालकीण नाहीं तर कालाटोपी आहे. *

**निकिटा**:—बस झालं! तुला तिच्याशीं काय करायचं आहे? तिच्या-संबंधानं विचार देखील मनांत आणूं नको. तूं माझ्याकडे पहा. मी घरचा मालक आहें. मला वाटेल तें मी करीन. तिच्यावर प्रेम करायचं मी सोडून दिल आहे. आतां तुझ्यावर मी प्रेम करीन, वाटेल तिच्यावर मी प्रेम करीन. या घरांत आतां माझा अधिकार चालला पाहिजे. तिनं माझं ऐकलं पाहिजे. तिला असं माझ्या जोड्यापाशीं उभं करीन. (पायाकडे बोट दाखवितो.) काय करावं? आपल्यापाशीं कॉन्सर्टिना§ नाहीं. ( गाऊं लागतो. )

[मिट्रिश प्रवेश करतो. ओव्हरकोट वगैरे काढून ठेवतो व माळ्यावर चढतो.]

**मिट्रिश**:—बायका पुन्हां भांडूं लागल्या असं दिसतं. चांगली केशाकेशी झाली असेल. अरे, देवा! देवा!

**अकीम**:--( माळ्यावर एका बाजूला बसतो. ) चल वरती ये. चल ये, या कोंपऱ्यांत ये.

---

* वारंवार तुरुंगांत येणाऱ्याला 'कालाटोपी' हें कैद्यांत प्रचलित असलेलें रूढ नांव आहे.

§ दोन्ही हाताच्या बोटांनीं वाजविलें जाणारें तंतुवाद्य.

**मिट्रिशः**——आपापसांत यांचीं भांडणं मिटत नाहींत असं दिसतंय.

**निकिटा**—— दारू बाहेर काढ. चहाबरोबर तीहि थोडी घेऊं.

**नानीः**—( अकुलिनाला उद्देशून ) ताई, सामोवारमध्यें पाणी उकळूं लागलं आहे.

**निकिटाः**—अन् तुझी आई कुठं आहे ?

**नानीः**——ती तिथं बाहेर रस्त्यांत रडत उभी राहिली आहे.

**निकिटाः**——असं पाहिजे ! बोलाव तिला व सामोवार घेऊन यायला सांग. अन् ए अकुलिना, तूं चहाची तयारी कर.

**अकुलिनाः**—काय, चहाची तयारी ? ठीक आहे. ( जिनसा आणते. )

**निकिटाः**——(पार्सलें सोडतो. दारूच्या बाटल्या, बिस्किटें, खारे मासे बाहेर काढतो. ) हें सर्व माझ्याकरितां. हें सूत तिच्याकरितां. ती बया रस्त्यावर जाऊन उभी राहिली आहे अन् पैसे माझ्यापाशीं आहेत. जरा थांब. ( हिशेब करतो. ) यांत आणखी काय खर्च घालायचा ? गव्हाचं पीठ, ८० कोपेक * .... तेल .... बाबांना, १० रूबल .... बाबा, या, इकडं या, आपण आतां चहा घेऊं.

[स्तब्धता. अकीम उठून बसतो. पायाच्या पट्ट्या गुंडाळूं लागतो. सामोवार घेऊन अनीशा प्रवेश करते. ]

**अनीशाः**—–कुठं ठेवूं ?

**निकिटाः**—कां, पाटलाकडं गेली होतीस कां ? हां असंच पाहिजे. नुसती बकबक मात्र करशील. हातून तर कांहींच व्हायचं नाहीं. हें पहा, आतां हें ढोंग पुरें कर. उगीच जळफळूं नकोस. बैस, चहा घे. (तिच्याकरितां दारूचा पेला भरून ठेवतो.) अन् हें तुझ्याकरितां आणलं आहे. ( तिला सूत दाखवितो. अनीशा तें मुकाट्यानें घेते व डोकें हालवून नापसंती दर्शविते. )

**अकीमः**——( माळ्यावरून खालीं उतरतो. लोंकरीचा कोट अंगावर चढवितो. टेबलाजवळ येतो व त्यावर पैसे ठेवतो. ) हे घे तुझे पैसे.

---

* १०० कोपेक = रूबल.

**निकिटा**:—( पैशाकडे पहात नाहीं. ) कां तुम्हीं पोषाख कां चढविला ?

**अकीम**:—मी जातों. काय म्हटलं ? मी जातों. मला क्षमा कर, क्षमा कर. देव तुझं भलं करो ! ( टोपी घालतो व पट्टा हातांत घेतो. )

**निकिटा**:—कां बाबा, तुम्ही कुठं चाललां ? इतक्या रात्रीचे तुम्ही कुठं चाललां ?

**अकीम**:—मला शक्य नाहीं. काय म्हटलं ? मला तुझ्या घरीं राहणं शक्य नाहीं. मला क्षमा कर.

**निकिटा**:—पण तुम्ही चहा न घेतांच जाणार ?

**अकीम**:—( पट्टा आंवळतो. ) होय, जातों. कारण असं कीं, तुझ्या घरांत अन्याय मातला आहे. तूं आपलं आयुष्य—काय म्हटलं ?—अगदी वाईट रीतीनं घालवीत आहेस. निकिटा, हें चांगलं नाहीं बरं ! मी आतां जातों.

**निकिटा**:—हो, पण थोडें बोलायचें, थांबाल की नाही ? खाली बसा, चहा घ्या !

**अनीशा**:—कां बाबा ! शेजारींपाजारी आम्हांला काय म्हणतील ? तुमचा कुणीं काय अपराध केला ?

**अकीम**:—कांहीं नाही, कुणीं कांहीं माझा अपराध केला नाहीं. मुळींसुद्धां अपराध केला नाही. माझं म्हणणं येवढंच, काय समजलं ? माझा मुलगा बहकला आहे. तो आपला सत्यानाश करून घेण्याच्या मार्गाला लागला आहे.

**निकिटा**:—काय माझा सत्यानाश कसा काय झाला ? दाखवा, सिद्ध करून दाखवा पाहूं !

**अकीम**:—सत्यानाश, सत्यानाश ! तूं अगदीं त्याच पंथांत आहेस. मीं तुला मागें, त्या वेळीं, काय सांगितलं होतं ?

**निकिटा**:—तुम्हीं काय, पुष्कळ सांगितलं होतं !

**अकीम**:—त्या पोरक्या पोरीबद्दल मी तुझ्याजवळ बोललों होतों. तिच्या बाबतींत तूं अन्याय केला आहेस. त्या पोरक्या मरीनाच्या बाबतींत तूं अन्याय केला आहेस असं मीं म्हटलं होतं.

**निकिटाः**——हो हो ! पुन्हां त्याचं तेंच सुरू झालं ! मागं काय झालं तें होऊन गेलं——गेलं तें सगळं मागं पडलं.

**अकीमः**——(प्रक्षुब्ध होऊन) मागं होऊन गेलं ! नाहीं बाळ, तें तसं नाहींसं होत नाहीं पाप, काय समजलं? पाप पापाला चिकटत जातं. पाप पापाला आपल्या मागून ओढून नेतं अन् तूं तर पापांत घट्ट रुतून गेला आहेस. निकिटा, पापाच्या चिखलांत तूं घट्ट रुतून गेला आहेस. काय समजलं ? पापाच्या चिखलांत तूं घट्ट रुतून गेला आहेस !

**निकीटाः**——बसा, खालीं बसा, चहा घ्या अन् मागचं सगळं विसरून जा.

**अकीमः**——मला तें शक्य नाहीं. काय म्हटलं ? मला चहा घेणं शक्य नाही. कारण तूं चालविलेला हा किळसवाणा प्रकार पाहून माझं मन विटून गेलं आहे. शक्य नाहीं, काय म्हटलं, तुझ्याबरोबर बसून चहा पिणं शक्य नाही.

**निकीटाः**——हां ! हां ! असंच तो बडबडत राहणार ! या, चहा घ्यायला या

**अकीमः**——तूं आतां श्रीमंत झाला आहेस. श्रीमंती हें एक मोहजालच आहे. काय म्हटलं ? या मोहजालांतच तूं सापडला आहेस हाय ! निकिटा, ईश्वराला श्रीमंतीची गरज नाही. ईश्वराला आत्म्याची गरज आहे.

**निकीटाः**——होय. आतां खरंच बोलायचं म्हणजे माझ्या घरांत येऊन मला शिव्या देण्याचा तुम्हांला काय हक्क आहे ? तुम्ही माझ्या पाठीमागं कां लागलां आहां ? आतां मी काय लहान कुक्कूबाळ आहें ? माझे केंस धरून मला ओढात न्यावें. आतां तें सगळं बदललं आहे. तें सर्व आतां विसरा.

**अकीमः**——होय, खरं आहे. आतांशा, काय म्हटलं ? मुलंच बापाची दाढी धरून त्यांना ओढून नेतात असं मीं ऐकलं आहे ! पण त्यांतच नाश आहे, नाश आहे.

**निकिटाः**——(रागानें) तुमची कांहीं मदत न घेतां आम्ही आतां रहात आहों. अन् तुम्हीच गरज पडली म्हणून आमच्याकडं आलां.

**अकीमः**—काय, तूं पैशाबद्दल बोलतोस कीं काय ? ते तिथं ठेवले आहेत. भिक्षा मागेन, काय समजलास ? भिक्षा मागेन पण तुझा पैसा घेणार नाहीं, समजलं !

**निकिटाः**--बस्स ! पुरे आतां ! उगाच कां संताप करून घेतां ? अन् लोकांना त्रास ! धरा, त्यांचा हात धरा.

**अकीम**--(ओरडतो.) चला, व्हा बाजूला. मी इथं राहणार नाहीं. तुझ्या या घरच्या घाणींत राहण्यापेक्षां मी एकाद्या कुंपणाच्या सावलीखालीं जाऊन निजेन. फूः, ईश्वर मला क्षमा करो ! (जातो.)

**निकिटा**--बरं झालं, सुटलों !

**अकीमः**—(पुन्हां दरवाजा उघडतो.) शुद्धीवर ये, निकिटा, शुद्धीवर ये. ईश्वराला अंतःकरण पाहिजे आहे ! (जातो.)

**अकुलिनाः**—(कप घेते.) बरं, चहा ओतूं कां ? (कप हातांत घेते. सर्व मुकाट्यानें बसतात.)

**मित्रिशः**--(ओरडतो.) देवा, देवा, मी पातकी आहें, पतित आहें. मला क्षमा कर. (सगळे चकित होतात.)

**निकिटाः**—(बांकावर निजतो.) हो, हो, किती उदासवाणं वाटत आहे ! (अकुलिनाला उद्देशून) कॉन्सटिना कुठं आहे ?

**अकुलिनाः**—कॉन्सटिना ! पुन्हां त्याला त्याची आठवण झाली. कां, तूंच तो नीट करण्याकरितां नेला होतास ! तुझ्या कपांत चहा ओतून ठेवला आहे. पी ना तो !

**निकिटाः**—नको तो मला ! दिवे मालवून टाक....हां ! मला किती उदासवाणं वाटूं लागलं, किती उदासवाणं ! (हुंदके देऊं लागतो.)

[ पडदा ]

**अंक तिसरा समाप्त**

---

# अंक चौथा

[ पावसाळ्याचे दिवस. सायंकाळ, चांदणं पडलं आहे. परसाच्या आंतली बाजू, झोंपडीची पिछाडी, उजव्या बाजूला फाटक व डाव्या बाजूला कोठार. दारू पिऊन झिंगून गेलेल्या लोकांचें आरडणेंओरडणें झोंपडींतून ऐकूं येतें. एक शेजारीण झोंपडीतून बाहेर येते व दुसऱ्या शेजारणीला खुणावते. ]

**दुसरी शेजारीण**:—अकुलिना कुठं बाहेर आली नाही. हें कसं काय ?

**पहिली शेजारीण**:—ती कां बरं आली नाही ? ती आनंदानं इकडं तिकडं फिरली असती; पण ती बरीच आजारी आहे. तुला माहीत आहे ? नवऱ्या मुलाचे नातेवाईक आले आहेत व मुलीला पहायची त्यांची इच्छा आहे. अन् काय सांगावं, ती आजारी आहे व पडून राहिली आहे. अन् बाहेर पडूं शकत नाही. गरीब बिचारी !

**दुसरी शेजारीण**:—पण हें असं कसं झालं ?

**पहिली शेजारीण**:—तिला एका दुष्टाची दृष्ट लागली अन् तिच्या पोटांत दुखूं लागलं असं म्हणतात.

**दुसरी शेजारीण**:—तूं असं तर नाही ना म्हणत ?

**पहिली शेजारीण**:—दुसरंतिसरं काय असणार ? ( कुजबुजते. )

**दुसरी शेजारीण**:—हें पहा गडे, यांतूनहि सुटायला मार्ग आहे. पण तें त्याच्या नातेवाइकांच्या खात्रीनं लक्ष्यांत येईल.

**पहिली शेजारीण**:—त्यांना फार कळणार ! ते सगळे दारू पिऊन आले आहेत. शिवाय ते मुख्यत: हुंड्याच्या माग आहेत. मुलीच्या बरोबर काय काय देणार आहेत ठाऊक आहे ? दोन रग, सहा पोषाख, एक फ्रेंच शाल, अन् बरंच तागाचं कापड, शिवाय आणखी पैसे—२०० रूबल !

**दुसरी शेजारीण**:—तें सगळं ठीक आहे. पण असल्या बेअब्रूपुढं काय करणार? पैशानं ती कांहीं भरून निघायची नाहीं! पैसा कुणाचं समाधान करूं शकणार नाहीं.

**पहिली शेजारीण**:—हुश्! ........ त्याचा बाप आला वाटतं!

[ बोलणं बंद करून त्या झोंपडींत जातात. नवऱ्या मुलाचा बाप खोंकत खोंकत बाहेर येतो. ]

**बाप**:—ओ! अगदीं घामाघूम झालों बुवा! किती भयंकर उकडतय! थोडीशी मोकळी हवा तरी घेऊं! (खोंकत उभा राहतो.) काय भानगड आहे समजत नाही! देव जाणे! कांहीं तरी आहे खरं. मला तरी बरं वाटेनासं झालं आहे--बरं, ही सगळी त्या म्हातारीची भानगड दिसत आहे.

[मॅट्रियोना झोंपडीतून बाहेर येते.]

**मॅट्रियोना**:—अन् बाप कुठं आहे, याचाच मी विचार करीत होतें. बरं झालं तुम्ही इथं सापडला. बरं, देव भलं करो! सर्व कांहीं ठीक आहे. सगळं कांही जसं असायला पाहिजे तसं आहे अगदीं कुलीनपणाला साजेलसं आहे. लग्न जुळवून आणायचं म्हणजे उगीच फुशारकी मारून उपयोगाची नाहीं. मला तशी संवयहि नाही. मी तें कधीं शिकलेंहि नाहीं. पण तुम्हांला अगदीं योग्य स्थळ मिळालं. देव भलं करो! माझेहि उपकार तुम्ही जन्मभर विसरणार नाहीं. ती मुलगीच तशी चांगली आहे. सर्व जिल्ह्यांत अशी मुलगी आढळायची नाहीं.

**बाप**:—तें सगळं खरं, पण पैशाचं काय?

**मॅट्रियोना**:—पैशाची मुळींच काळजी नको. तिच्या बापाकडून तिला जें कांही मिळालं तें सर्व तिच्याबरोबर देण्यांत येणार आहे. अन् सहजासहजीं असे पैसे मिळाले तर त्यांत तुमचं कांहीं वाईट नाहीं. दिवस कसले आले आहेत! पन्नास रूबलांच्या चांगले तिप्पट!

**बाप**:—आमची तक्रार नाही, पण हें सर्व पोराकरितांच करायचं ना? आमचं काय जास्तींत जास्त चांगलं स्थळ मिळावं, अशीच इच्छा असणार!

**मॅट्रियोना**:—हें पहा, मी आपली सरळ सांगतें; जर या खटपटींत मी नसतें तर इतकी चांगली मुलगी तुम्हांला कधींहि मिळाली नसती. कामिलिनाकडून त्यांना `नुकतीच मागणी आली होती, पण मी त्याच्या विरुद्ध होतें. पैशासंबंधानं पहाल तर तें सुद्धां खरं आहे तें सांगून टाकतें. जेव्हां तिचा बाप वारला–ईश्वर त्याच्या आत्म्यास शांति देवो–तेव्हां निकिटाला घरचा कारभार पाहण्यास सांगावं असं त्यानं आपल्या विधवा बायकोला सांगून ठेवलं होतं. अर्थात् हें सर्व माझ्या मुलापासून मला समजलं होतं. अन् सर्व पैसा अकुलिनाला मिळायचा होता. दुसरा कुणी असता तर त्यानं आपल्या पोळीवरच तूप ओढून घेतलं असतं, पण निकिटानं झाडून सारं तिचं तिलाच देऊन टाकायचं ठरवलं ! ही कांहीं क्षुल्लक गोष्ट नाहीं. किती मोठी रक्कम आहे याचा विचार करा.

**बाप**:—यापेक्षां जास्त पैसा तिला दिला होता असं लोक म्हणतात. तो मुलगाहि कांहीं कमी हुशार नाहीं !

**मॅट्रियोना**:—हो, हो ! दुसऱ्याच्या हातांतला तुकडा नेहमीं मोठाच दिसत असतो ! तिला जें कांहीं मिळालं तें सर्व दिलं जाईल. उगाच शंका घेऊं नका, अगदीं खात्री बाळगा. मुलगी पण मुलगी आहे, कशी अगदीं नक्षत्रासारखी !

**बाप**:—असं कां ? मग ठीक आहे. पण ती बाहेर कां आली नाहीं, याचंच मला व माझ्या म्हातारीला आश्चर्य वाटत आहे. समजा, ती आजारी असली, हो ........ ! असंहि आम्हांला वाटलं होतं.

**मॅट्रियोना**:—ओहो ! कोण, ती ! आजारी ! कां सबंध जिल्ह्यांत तिच्यासारखी मुलगी सांपडायची नाहीं. मुलगी कशी अगदीं घंटेप्रमाणें खणखणीत पाहून घ्यावी; तिच्यांत तुम्हांला यत्किंचितहि दोष सांपडायचा नाहीं. पण परवां तर तुम्हीं तिला पाहिलीच. अन् कामाच्या दृष्टीनं पहाल तर तुम्ही आश्चर्यचकितच व्हाल. ती किंचित् बहिरी आहे ही गोष्ट खरी. तुम्हांला ठाऊक आहे कीं, सूर्यावरदेखील डाग आहेत. अन् ती बाहेर येत नाहीं याच कारण असं कीं, तिला दृष्ट लागली आहे. तिच्यावर कुणीं मंत्र टाकला आहे. कोणत्या चेटकीचं हें काम आहे मला ठाऊक आहे. पण मलाहि

उताराचा मंत्र माहीत आहे. ती पोर उद्यां उठेल व हिंडू फिरूं लागेल. मुलीसंबंधानं कांही काळजी करूं नका.

बाप:—बरं, तर मग, सगळं ठरलं ना ?

मॅट्रिओना:—होय, अर्थात् ठरलंच. तुम्हीं मात्र मागं घेतां उपयोगी नाही. अन् मला मात्र विसरूं नका हं ! किती तरी दगदग मीं केली आहे. विसरूं नका बरं मला . . .

[ झोंपडींतून स्त्रीचा आवाज येतो. ]

[ आवाज—आपल्याला जायचं असेल तर जाऊं या. चला तर इव्हॅन ! ]

बाप:—हां, मी येतोंच आहे. (जातो. पाहुणे रस्त्यांत गोळा होतात आणि जाण्याची तयारी करतात.)

नानी:—(झोंपडीबाहेर धांवत जाते व अनीशाला बोलावते.) आई !

अनीशा:—(आंतून) काय, तुला काय पाहिजे ?

नानी:—आई, इकडं ये, नाहीं तर ते ऐकतील.

[ अनीशा प्रवेश करते आणि त्या दोघी मिळून पडवीकडे जातात. ]

अनीशा:—बरं, आहे काय ? अकुलिना कुठं आहे ?

नानी:—ती कोठाराकडं गेली आहे. ती तिथं काय करीत आहे कुणास ठाऊक. मला तर भीति वाटते. "मला सहन करणं शक्य नाहीं," ती म्हणते. "मी ओरडेन, मोठ्यानं ओरडेन," असं ती म्हणते. बरं, ती ओरडली नाहीं हेंच बरं !

अनीशा:—तिला थांबावंच लागेल. आम्हांला आतां पाहुण्याकडं अगोदर पाहिलं पाहिजे.

नानी:—आई, काय सांगूं, तिची प्रकृति इतकी बिघडली आहे व ती इतकी संतापून गेली आहे कीं ती म्हणते, "माझ्या खुशालीकरतां चहा पिऊन करायचं काय ? मी लग्न करणार नाहीं. मी मरून जाईन." आई, समज ती मेली तर ! मला तर भीति वाटते. मी अगदीं घाबरून गेलें आहे !

**अनीशाः**--कांहीं भ्यायचं कारण नाहीं, ती मरणार नाहीं. पण तिच्या जवळ जाऊं नको. चल. माझ्याबरोबर चल (अनीशा व नानी बाहेर जातात.)

**मिट्रिशः**--( फाटकाच्या आंत येतो व गवत गोळा करूं लागतो. ) अरे, देवा, देवा ! काय दारूचा अगदीं फन्ना उडविला आहे ! जिकडं तिकड अगदीं दरवळून गेलं आहे ! इथंदेखील घाण येत आहे. पण नको, मला नाहीं घ्यायची. मरूं दे, मी नाहीं घेणार ! पहा, त्यांनीं गवत कसं इकडं पसरून टाकलं आहे. ते गवत खात नाहींत हें खरं पण अगदीं पायाखालीं तुडवून त्याचा नाश करतात. भाराभर गवताचा असा बघतां बघतां नाश झाला. ओ, किती ही घाण ! अगदीं नाकाखालीं कुणी तरी बाटली धरून ठेवली आहे ! जाऊं दे, झाली आतां निजायची वेळ झाली. पण मी त्या झोंपडींत म्हणून जाणार नाहीं. माझ्या नाकाखालून जशी काय ती वाहतीच आहे, असं मला वाटूं लागलं आहे. किती भयंकर दर्प आहे ! (पाहुणे जात आहेत असें ऐकूं येतें.) शेवटीं ते गेलेच म्हणायचे. हरहर ! हे लोक स्वत:ला गोत्यांत घालीत आहेत व परस्परांनाहि फसवीत आहेत. हा सर्व फसवाफसवीचा खेळ आहे.

[ निकिटा प्रवेश करतो. ]

**निकिटाः**--मिट्रिश, जा नीज जा. मी हें सगळं आंवरून ठेवतों.

**मिट्रिशः**--ठीक, तें सर्व मेंढयापुढं टाक. बरें, ते सगळे निघून गेले ना ! तूं प्रत्यक्ष पाहिलंस कीं नाहीं ?

**निकिटाः**—होय, ते गेले. पण एकंदरींत कांहीं बरं नाहीं ! काय करावं, हेंच मला कळत नाहीं !

**मिट्रिशः**--त्यांत बरं काय नसायचं ? पण समजा असं कांहीं झालं तर अनाथालय* आहेचना ! कुणींहि जावं अन् तिथं आपलं मूल टाकून यावं. त्या सगळ्यांना ते पोसतात. तिथं कितीहि मुलांना नेऊन टाका, ते कांहीं विचा-

* मास्को येथील अनाथालय.

रायचे नाहींत. उलट दाई म्हणून पाजवायला तयार असल्यास आईला ते पैसे देतात. आतां हें काम अगदीं सोपं होऊन बसलं आहे.

**निकिटाः**—पण मिट्रिश, लक्ष्यांत ठेव. उगाच इकडंतिकडं बडबडत सुटूं नकोस.

**मिट्रिशः**—मला त्याच्याशीं काय करायचंय? तुला जसं वाटेल तसं याच्यावर पांघरूण घाल. अरे बाप, किती दारू घेतली आहेस! मी आंत जातों. अरे देवा! (जांभया देत देत जातो.)

[ निकिटा बराच वेळ स्तब्ध राहतो. बर्फाच्या गाडीवर बसतो. ]

**निकिटाः**—हाच एक मार्ग आहे!

[ अनीशा प्रवेश करते. ]

**अनीशाः**—तूं आहेस तरी कुठं?

**निकिटाः**—इथं.

**अनीशा**—तिथं करतोस काय? आतां वेळ गमावण्याची सोय नाहीं. आपण त्याची एकदम वाट लावली पाहिजे.

**निकिटाः**—आतां काय करावं?

**अनीशाः**—काय करायचं तें मी तुला सांगतें. तुला तें केलंच पाहिजे.

**निकिटाः**—कांहीं करायचंच असेल .... तर तें अनाथालयांत नेलेलं बरं!

**अनीशाः**—मग तें तूंच वाटलं तर घेऊन जा. तोंडाला काळोखी लागेल अशीं कृत्यं करण्याचा तुला नाद आहे; पण प्रत्यक्ष प्रसंग आला म्हणजे त्यांतून निभावून जाण्याची ताकद तुझ्या आंगांत नाहीं. तूं मनाचा दुबळा आहेस.

**निकिटाः**—काय करायचं काय?

**अनीशाः**—खालीं तळघरांत जा. काय सांगतें? अन् एक खड्डा खणून ठेव.

**निकिटाः**—याला दुसरा कांहीं मार्ग नाहीं कां?

**अनीशा:**--(त्याची नक्कल करीत) म्हणे "दुसरा मार्ग नाहीं कां ?" आम्हांला दुसरा मार्ग दिसत नाहीं. एक वर्षापूर्वीच ही गोष्ट तुझ्या लक्ष्यांत यावयास पाहिजे होती. तुला काय सांगतें तें तूं कर !

**निकिटा:**—कसला प्रसंग आला !

[ नानी प्रवेश करते. ]

**नानी:**—आई, आजी बोलावते आहे ! मला वाटतं ताईला मूल झालं आहे अन् तें रडत नाहीं हेंच बरं आहे.

**अनीशा:**--काय बडबड चालविली आहेस ? तुला पटकी आली ! मांजराचीं पिलं तिकडं पिरपिरत असतील. जा, झोंपडींत जाऊन नीज जा; नाहीं तर चांगला खाऊ मिळेल !

**नानी:**—नाहीं आई, खरोखर मी अगदीं शपथेवर सांगतें.

**अनीशा:**—( तिला मारण्याचा आवेश आणून व हात उगारून ) चांगला खाऊ मिळेल. चल जा बघूं इथून ! अन् पुन्हां माझ्यासमोर येऊं नको. (नानी झोंपडींत धांवत जाते. निकिटाला उद्देशून ) कर, सांगितल्याप्रमाणं कर, नाहीं तर लक्ष्यांत ठेव. (बाहेर जाते.)

**निकिटा:**—(एकटा. बराच वेळ स्तब्ध राहून) अगदीं हद्द झाली! अरे, या बायका म्हणजे काय करतीलन् काय नाहीं. खरोखरीच पेंच येऊन पडला आहे. मला म्हणते कीं, एक वर्षापूर्वीच विचार कां केला नाहीं ! इतका पुढला विचार कोण करीत असतो ? विचार तरी केव्हां करणार ? कां बरं ही अनीशाच गत वर्षीं माझ्या मागें मागें लुडबुड करीत होती. मीं तरी काय करणार ? मी काय संन्यासी आहें ? धनी वारला. अन् पुढं योग्य तें करून तें पाप झांकून टाकलं. म्हणून त्या बाबतीत मला कुणी दोष देऊं शकलं नाहीं. अशा गोष्टी सर्वत्रच होत नाहींत काय ? अन् नंतर त्या पुड्यांचं प्रकरण ! तिला तसं करायला मी कां सांगितलं होतं ? ती कुत्री असं कांहीं तरी करणार आहे, असं मला समजतं तर मीं तिला ठार केलं असतं. खात्रीनं सांगतों, मीं तिला ठारच केलं असतं. असल्या या भयंकर कृत्यामध्यें तिनं मला भागीदार करून ठेवलं आहे. या छिनाल

रांडेनं माझी अशी अवस्था करून टाकली आहे. अन् त्या दिवसा-पासूनच मला तिचा तिटकारा वाटूं लागला. आईनं जेव्हां तें सर्व मला सांगितलं त्या वेळेपासून मला तिचा अगदी तिटकारा येऊं लागला. ती माझ्या डोळ्यासमोर सुद्धां नकोशी झाली. अशा मन:स्थितींत मी तिच्या-बरोबर सुखानं राहणार तरी कसा? अन् नंतर या प्रकरणाला सुरवात झाली. ही सटवी माझ्याभोंवती घिरट्या घालूं लागली. बरं, मी तरी काय करणार? मीं ही गोष्ट केली नसती तर दुसऱ्या कुणीं केली असती! अन् त्याचा हाच परिणाम झाला असता! तथापि या बाबतींतहि माझा कांहीं दोष नाहीं! पण हें पहा, कसलं लचांड उपस्थित झालं! (विचार करीत बसतो.) या बायका खरोखरीच धीट! काय पण बेत योजला आहे! पण तो पार पाडण्याच्या बाबतींत मी भागीदार होणार नाही!

[ मॅट्रियोना कंदील व कुदळ घेऊन धापा टाकीत येते. ]

**मॅट्रियोना:**—असा गैद्यासारखा बसून कां राहिला आहेस? तुझ्या बायकोनं तुला काय करायला सांगितलं? लक्ष्यांत नाहीं? चल, तिनं सांगितल्याप्रमाणं तयारी करून ठेव.

**निकिटा:**—तुम्हीं काय योजलंय तरी काय?

**मॅट्रियोना:**—काय करायचं तें आमचं आम्हांला माहीत आहे. तुझ्या वांट्याचं काम तूं कर.

**निकिटा:**—तुम्ही मला घोंटाळ्यांत पाडूं पहात आहां!

**मॅट्रियोना:**—काय? तूं आतां मागं तर घेत नाहींस? तुझा काय विचार आहे? आतां हें प्रकरण इथवर आलं, अन् तू आतां आपलं अंग चोरीत आहेस?

**निकिटा:**—पहा, ती गोष्ट किती भयंकर आहे याचा विचार तरी कर! तें पोर तर जिवंत आहे!

**मॅट्रियोना:**—जिवंत खरं! पण तें जिवंत असलं तरी जवळ जवळ मेल्या-सारखच झालं आहे. अन् माणसानं तरी काय करायचं? बरं, तें अनाथालयांत घेऊन जायचं–तिथं झालं तरी तें मरणारच! शिवाय होईल काय तर ही गोष्ट

षट्कर्णी होईल, लोक तिच्यासंबंधानं आपसांत बोलूं लागतील, अन् ती पोरगी आमच्या अंगावर पडेल.

**निकिटा**:--अन् समजा तें कुठं बाहेर सांपडलं ?

**मॅट्रियोना**:—पण तें सर्व आपल्या स्वतःच्या घरांतच कां करतां येऊं नये ? आम्ही अशी कांहीं व्यवस्था करूं कीं, कुणाला चुकूनसुद्धां कांहीं कळणार नाहीं. फक्त आम्ही सांगतों तसं मात्र कर. आम्हां बायकांना पुरुषा-शिवाय करतां यायचं नाहीं. मग घे ती कुदळ अन् खड्डा खणून दे. मी कंदील धरतें.

**निकिटा**:--काय, मी काय करूं ?

**मॅट्रियोना**:--(हलक्या स्वरांत) खड्डा खणून दे. मग तें आम्ही इथं आणूं व एका क्षणांत तें गडप करून टाकूं ! पहा, ती पुन्हां हांका मारूं लागली. चल तर मग, मीहि येतें.

**निकिटा**:--मग मूल काय मेलेलं आहे ?

**मॅट्रियोना**:--अर्थात् ! फक्त तूं आतां जलदी केली पाहिजेस ! नाहीं तर ते लोकांच्या लक्ष्यांत येईल ! लोकांच्या तें दृष्टीस तरी पडेल किंवा त्याच्यासंबंधाच्या गोष्टी त्यांच्या कानीं तरी जातील. या टवाळ लोकांना काय, सगळं समजून घ्यायला पाहिजे ! अन् पोलिस तर आजच संध्याकाळीं इकडून टेहळणी करून गेला ! बरं मग, हें पहा, (त्याच्या हातांत कुदळ देते.) तूं खालीं तळघरांत जा अन् त्याच्या कोंपऱ्यांत तिथं एक खड्डा खण. तिथली जमीन भुसभुशीत आहे अन् ती सहज बुजवूनहि टाकतां येईल. भूमिमाय कुणापाशीं कांहीं बडबडायची नाहीं. ती तें अगदीं गुपित राखील. मग, चल कसा, चल बाबा !

**निकिटा**:--असं करून तुम्ही मला कसल्या तरी भानगडींत घालणार असं दिसतं आहे. काय पीडा माझ्यामागं लागली आहे ! मीच इथून काळं करतों. तुम्हांला काय करायचं असेल तें करा.

**अनीशा**:--(दरवाजाच्या फटींतून) बरं, त्यानं खड्डा खणला कां ?

**मॅट्रियोना**:--तूं कशाला इकडं आलीस ? त्याला ठेवलं आहेस तरी कुठं ?

**अनीशा**:--मीं तें चिध्यांखालीं झांकून ठेवलं आहे. कुणाला कांहीं ऐकूं यायचं नाहीं. बरं, त्यानं खणलं कां ?

**मॅट्रियोना**:--तो खणायला तयार नाहीं.

**अनीशा**:--(आंत धांवत गेते व रागावून) खणायला तयार नाहीं ? उद्यां तुरुंगांत नेऊन डांबलं म्हणजे समजेल. मी थेट इथून जाईन अन् पोलिसला सर्व कांहीं सांगून टाकीन. कुणाचा तरी सत्यानाश व्हायचा ! मला काय सगळेच सारखे ! मी थेट जाईन अन् सारं सांगून टाकीन.

**निकिटा**:--(भयभीत होऊन) काय, तूं सांगणार काय ?

**अनीशा**:--काय ? अगदीं प्रत्येक गोष्ट ! पैसे कुणीं घेतले ? तूं ! (निकिटा स्तब्ध होतो.) अन् विष कुणीं दिलं ? तर मीं दिलं पण तुला तें माहीत होतं. तुला माहीत होतं. माहीत होतं. आपण दोघांनीं संगनमतानं तें काम केलं.

**मॅट्रियोना**:--बस्स, पुरें झालं. निकिटा, बाळ ! तूं असा हट्ट कां धरून बसला आहेस ? आतां करायचं काय ? कांहीं तरी मार्ग काढलाच पाहिजे ना ? जा बाळ.

**अनीशा**:--पहा, ह्या भल्या गृहस्थाकडे ! त्याला सांगितलेलं करायला नको. निकिटा, तूं मला बरेच दिवस फसविलंस ! तूं मला पायाखालीं तुडविलंस ! आतां माझी पाळी आली आहे. जा, मी काय सांगतें ? नाहीं तर मघाशीं सांगितल्याप्रमाणं करून टाकीन--घे, ती कुदळ घे. चल आंत जा !

**निकिटा**:--अवदसा कुठली ! माझ्यामागं लागली आहे. ( कुदळ घेतो, पण चपापतो.) नाहीं, हें आपण केलं नाहीं तर काय होईल काय ? मी जात नाहीं.

**अनीशा**:--जात नाही ! (ओरडूं लागते.) धांवा हो धांवा !

**मॅट्रियोना**:--(तिच्या तोंडावर हात ठेवते.) तूं काय करते आहेस ? वेड बीड तर लागलं नाही ? तो जाईल. जा बाळ ! माझं तरी ऐक.

**अनीशा**:--खून झाला म्हणून मी आरडाओरडा करीन.

**निकिटाः**---बस्स, आतां तोंड बंद कर. काय लोक आहेत ! ( तळघराकडे जातो.)

**मॅट्रियोनाः**---होय, असंच केलं पाहिजे ! बाळ, तुला चैन कशी करावी हें समजतं तर तीमुळें होणारे परिणामहि छपवायचे कसे हें तुला समजलं पाहिजे.

**अनीशाः**---(अद्याप प्रक्षुब्ध स्वरांत) यानं मला आपल्या पायाखालीं तुडवलं आहे---यानं अन् याच्या त्या उनाड पोरीनं ! पण आतां यापुढं मी तें सहन करणार नाहीं. मी एकटीच काय म्हणून बळी जाऊं ? त्यालाहि खुनी होऊं दे ! मग त्याला कसं काय असतं तें समजून येईल.

**मॅट्रियोनाः**---पहा, पहा, कशी तणतणते आहे ! इतकी संतापून जाऊं नको. मुली, जमेल तसं हळू हळू आपलं काम करून घ्यावं. तूं त्या मुलीकडे जा. तो तें काम करील. ( कंदील घेऊन निकिटाच्या मागून जाते. तो तळघरांत उतरतो.)

**अनीशाः**---अन् त्याच्या त्या भिकारड्या पोराची नरडी दाबायलाच त्याला मी लावणार आहे. (अद्याप प्रक्षुब्ध स्वरांत) पीटरच्या हाडांच्या ओझ्यानं माझं अंतःकरण दडपून गेलं असून मी मरायला टेकलें आहे ! त्यालाहि याची कल्पना आली पाहिजे. मी असं केल्याशिवाय कधीहि राहणार नाहीं, कधींहि राहणार नाहीं.

**निकिटाः**---(तळघरांतून) कंदील दाखीव ना !

**मॅट्रियोनाः**---(त्याला उजेड दिसेल अशा तऱ्हेनें कंदील धरते. अनीशाला उद्देशून) तो खणीत आहे. जा, त्याला घेऊन ये.

**अनीशाः**---तूं त्याच्याजवळच अस. नाहीं तर तो भिकारडा निघून जाईल. अन् मी जातें व तें घेऊन येतें.

**मॅट्रियोनाः**---लक्ष्यांत ठेव. त्याला बाप्तिस्मा द्यायला विसरूं नकोस. नाहीं तर मी देईन. तुझ्यापाशीं क्रॉस आहे कीं नाहीं ?

**अनीशाः**--- मला तो मिळेल. मला तें कसं करायचं हेंहि ठाऊक आहे. (जाते.)

**मॅट्रियोना**:—पहा, कशी संतापानं थरथर कांपत होती, पण तिलाहि फसविण्यांत आलं आहे, हें विसरतां कामा नये. बरं, तें असो. पण देवाच्या कृपेनं आम्हीं ही भानगड मिटविली* म्हणजे या गोष्टीचा निकालच लागेल. त्या पोरीला इथून घालवून द्यायला फारशी दगदग पडायची नाहीं. माझ्या पोराला मग सुखानं राहतां येईल. देव भलं करो! घर तर गडगंज भरलं आहे. माझे उपकारहि ते विसरणार नाहींत. मॅट्रियोना नसती तर यांना कुणीं विचारलं असतं? प्रसंग आला असतां त्यांतून पार पडण्याकरितां निरनिराळ्या युक्त्या योजण्याचं काम यांच्या हातून झालं नसतं. (तळघरांत डोकावून पाहून) कां, खणून झालं कां बाळ?

**निकिटा**:—(डोकें बाहेर काढतो.) तिथं तूं काय करीत आहेस? त्याला लौकर घेऊन ये. कशाची वाट पहात आहेस? असं करायचंच जर आहे, तर होऊन जाऊं दे.

**मॅट्रियोना**:—झोंपडीच्या दरवाजाजवळ जाते. अनीशाची व तिची गांठ पडते. अनीशा चिंध्यांत गुंडाळलेलं मूल घेऊन बाहेर पडते.) बरं त्याला बाप्तिस्मा दिलास कां?

**अनीशा**:—हो, दिला तर! ती पोराला देतच नव्हती तिच्या हातून पोर हिसकावून घ्यावं लागलं म्हणून तर इतका उशीर लागला. (पुढें येते व निकिटाच्या हातांत मुलाला देते.)

**निकिटा**:—(तो तें घेत नाही.) तूं तें स्वतःच घेऊन ये.

**अनीशा**:—हें घे. पाहतोस काय? (पोराला त्याच्याकडे फेंकते)

**निकिटा**:—(त्याला पकडतो.) तें जिवत आहे! ओ हो, तें हालचाल करीत आहे. तें जिवंत आहे. आतां काय करावं?—

**अनीशा**:—(मुलाला त्याच्या हातून हिसकावून घेते व तळघरांतील जमिनीवर टाकते.) कर, जलदी कर व त्याचा गळा चेप म्हणजे तें जिवंत

---

* पुढचा चोथा अंक संपेपर्यंतचा भाग आणखी एका तऱ्हेनें लिहिला आहे. पण तो अनुवादित केला नाहीं.

राहणार नाहीं. (निकिटाला ढकलते.) हें तुझ्याच कर्माचं फळ आहे, तूंच त्याचा शेवट लावला पाहिजेस.

**मॅट्रियोना**:—(झोंपडीच्या दरवाजाजवळ बसते.) त्याचं अंतःकरण कोमल आहे. त्याच्या हातून हें काम व्हायचं नाहीं. त्याच्यावर मोठा कठिण प्रसंग आला आहे. बरं, पण त्याचं काय म्हणा ! हें त्याच्या पापाचंच फळ नाहीं कां ? (अनिशाकडे पाहते व बोलूं लागते. ) ओ हो हो, तो किती घाबरून गेला होता ! पण त्यांत आहे काय ? तें काम कठिण असलं तरी तें केल्याशिवाय आतां गत्यंतरच उरलेलं नाहीं. आतां ते नेऊन ठेवायचं तरी कुठं ? अन् असं पहा, किती तरी लोक पोरं व्हावीं म्हणून देवाची प्रार्थना करतात. पण नाहीं, परमेश्वर त्यांना मुलं देत नाही; अथवा झालींच तरी मरूनच तीं बाहेर येतात. आपल्या त्या पाद्र्याच्या बायकोचं पहा.......अन् इथं, त्याची गरज नसतांना तें जिवंत राहिलं आहे. ( तळघराकडे पाहते. ) मला वाटतं त्यानं त्या पोराचा निकाल लावला. ( अनीशाला उद्देशून ) बरं, काय झालं ?

**अनीशा**:—( तळघरांत डोकावून पाहते. ) त्यानं त्या पोरावर फळी टाकली आहे व तीवर तो बसला आहे. त्याचा निकाल लावलाच पाहिजे होता.

**मॅट्रियोना**:—हा ! हा ! पाप करण्याचा प्रसंग न येईल तर माणसाला किती तरी आनंद होईल ! पण असल्या प्रसंगीं माणसानं करायचं तरी काय ?

[ निकिटा तळघरांतून बाहेर पडूं लागतो. त्याचें सर्वांग थरथर कांपत असतें. ]

**निकिटा**:—तें अद्याप जिवंत आहे. माझ्या हातून तें आतां शक्य नाहीं ! तें जिवंत आहे जिवंत !

**अनीशा**:—तें जिवंत असेल तर तूं चाललास कुठं ? ( त्याला थांबवण्याचा प्रयत्न करते. )

**निकिटा**:—( तिच्या अंगावर धांवून जातो. ) चल, चालती हो. तुलाच ठार करीन ! ( तिचे हात धरतो; ती त्याच्या हातांतून निसटते. हातांत

कुदळ घेऊन तिच्या मागून धांवत जातो. मॅट्रियोना त्याच्याकडे धांवून जाते व त्याला थांबविते. अनीशा देवडीकडे धांवते. मॅट्रियोना त्याच्या हातांतील कुदळ काढून घेण्याचा प्रयत्न करते. आईला उद्देशून ) तुला ठार करीन, ठार करून टाकीन! चालती हो! ( मॅट्रियोना अनीशाकडे देवडीत धांवत जाते. निकिटा थांबतो. ) मी तुला ठार करीन. तुम्हांला सगळ्यांना मी ठार करीन!

**मॅट्रियोना:**—तो घाबरून गेला आहे म्हणूनच असं करीत आहे! कांहीं काळजी करायचं कारण नाही. त्याचा हा आवेश नाहींसा होईल!

**निकिटा:**-त्यांनीं मला हें काय करायला लावलं? काय करायला लावलं? तें कमं कुसमुसत होतं........माझ्या भारामुळं तें कसं अगदीं चिरडून गेलं! त्यांनीं माझ्याशीं असं वर्तन काय म्हणून केलं? अन् तें खरोखरीच जिवंत आहे, अद्याप जिवंत आहे. ( शांतपणानें ऐकतो. ) तें कुसमुसत आहे.......तें तिथ कुसमुसत आहे. (तळघराकडे धांवतो. )

**मॅट्रियोना:**—( अनीशाला उद्देशून ) तो तिकडं पुन्हां जात आहे. त्याला पुरून टाकायचं त्याच्या मनांत आहे असं दिसतंय. निकिटा, कंदील घेतलास तर बरं होईल.

**निकिटा:**—( तिच्याकडे लक्ष्य देत नाहीं, पण तळघराच्या दरवाज्यापाशी उभा राहून ऐकतो. ) कांहीच ऐकूं येत नाही! मला वाटतं, भास झाला. ( बाजूला सरतो व धांवतो. ) ती चिमकली हाडं माझ्या भाराखालीं कशीं चिरडून गेली. कर्रर्र....कर्रर....त्यांनीं मला हें काय करायला लावलं? ( पुन्हां ऐकतो. ) पुन्हां चिरचिर करीत आहे! होय, खरोखरीच तें चिरचिर करीत आहे. मग तें काय बरं असेल? आई, आई, हें पहा! ( तिच्याकडे जातो. )

**मॅट्रियोना:**—काय सोन्या!

**निकिटा:**—आई, आई, माझ्या हातून यापेक्षां जास्त कांहीं होणार नाहीं, कांहीं होणार नाहीं! आई, तूं माझी आई ना? माझ्यावर दया कर!

**मॅट्रियोना:**—बाळ, तूं किती घाबरून गेला आहेस! बाळ चल, चल, थोडी दारू घे, म्हणजे बरं वाटेल.

**निकिटाः**—आई, आई, मला वाटतं माझीच वेळ आतां भरत आली. तूं माझ्याशी असं कसं वागलीस? तीं चिमुकलीं हाडं कशीं चिरडून गेलीं! त्या पोरानं कशी चिरचिर केली! तूं माझी आई ना? मग तूं माझ्या बरोबर असं कां वागलीस? मला हें काम कां करायला लावलंस? ( बाजूला होतो व बर्फाच्या गाडीवर बसतो. )

**मॅट्रियोनाः**—ये, माझं बाळ तें. थोडा घोंट घे! रात्रींच्या वेळीं असं थोडंसं भेसुर वाटतंच. पण थोडं थांब. उजाडलं म्हणजे तुला बरं वाटेल. झालं, असे एकदोन दिवस गेले म्हणजे तुझ्या मनांतहि त्याच्यासंबंधानं विचार यायचा नाही. थोडा दम खा. त्या पोरीचं लग्न झालं म्हणजे तर तुझ्या तें मुळीच लक्ष्यांत यायचं नाहीं. पण तूं आतां जा, अन् थोडा दारूचा घोंट घे! मी स्वतःच तळघरांत जातें अन् सगळी कांहीं व्यवस्था करते.

**निकिटाः**—( एकदम जागें झाल्याप्रमाणें करतो व उठतो. ) कांहीं दारू शिल्लक राहिली आहे कां? असली तर सर्व पिऊन टाकतों. ( जातो )

[ अनीशा आतांपर्यंत दरवाजाजवळच उभी राहिलेली असते; त्याला ती हळूच मुकाट्यानें वाट देते. ]

**मॅट्रियोनाः**—जा, जा, बाळ, मीच सगळं करतें. मी स्वतःच खालीं जातें व खणतें! त्यानं ती कुदळ कुठं टाकली आहे? ( कुदळ पाहून आणते आणि तळघरांत खालीं जाते. ) अनीशा, इकडं ये. हा दिवा धर. धरतेस कां?

**अनीशाः**—अन् त्याचं काय?

**मॅट्रियोनाः**—तो फार घाबरून गेला आहे. तूं त्याच्याशी फारच निष्ठुरपणानं वागलीस. जाऊं दे त्याला; त्याच्याकडं लक्ष्य देऊं नकोस. तो आपोआप शुद्धीवर येईल देव त्याचं भलं करो! मीच आतां हें काम करतें. कंदील आतां खाली धर. म्हणजे मला सर्व दिसेल.

[ मॅट्रियोना तळघरांत जाते ]

**अनीशाः**— ( निकिटा ज्या दरवाजानें झोपडीत शिरला तिकडे पहात ) कां, पुरेशी दारू घेतली कां? आतांपर्यंत घमेंड मारीत होतास पण, आतां या वेदना कशा असतात याची कल्पना येईल. आतां थोडी तुझी घमेंड उतरेल.

**निकिटा:**—( झोंपडींतून बाहेर येऊन तळघराकडे धांवत जातो. ) आई, आई, ऐकलंस कां?

**मॅट्रियोना:**—( डोकें वर करते ) काय सोन्या, काय पाहिजे?

**निकिटा:**—( कानोसा घेत ) त्याला पुरून टाकूं नको. तें जिवंत आहे! तुला नाहीं ऐकूं येत? तें जिवंत आहे. तें चिरचिर करीत आहे! हें पहा, मला अगदीं चांगलं ऐकूं येत आहे.

**मॅट्रियोना:**—तें कसलं चिरचिर करणार? कां, तूं काय त्याची अगदी दामटी वळवून टाकली आहेस!. डोक्याच्या तर अगदी चिंधड्याच उडाल्या आहेत!

**निकिटा:**—मग मला काय ऐकूं येतंय! ( कान दाबून धरतो. ) तें अद्याप चिरचिरत आहे! माझा घात झाला! तुम्हीं मला काय करायला लावलं! ......मी आतां कुठं जाऊं? ( पायरीवर बसतो. )

[ पडदा ]

## चौथा अंक समाप्त



# अंक पांचवा

## प्रवेश पहिला

[समोर गवताची गंज. तिच्या डाव्या बाजूला धान्य झोडपण्याची जागा. उजव्या बाजूला धान्याचें कोठार. कोठाराचीं दारें उघडीं असतात. दाराबाहेर गवत विस्कटून पडलेलें असतें. या सर्वांच्या मागें झोंपडी, परसूं व आजूबाजूचीं छपरें असतात. झोंपडींतून गाण्याबजावण्याचा आवाज ऐकूं येत असतो. दोन मुली कोठाराजवळून झोंपडीकडे जात असतात.]

**पहिली मुलगी:**--पाहिलं, आपण इथपर्यंत तरी आपले बूट न मळिवतां येऊं शकलों. रस्त्यांत तर खूपच चिखल झाला आहे. (थांबतात व आपले बूट गवताला पुसतात. पहिली मुलगी गवताकडे पाहते. तिला कोणी तरी दिसतें.) कोण आहे बरं?

**दुसरी मुलगी:**—(गवताकडे पाहते व तिलाहि कोणी तरी दिसतें.) हा त्याच्या घरचा गडी, मिट्रिश. पहा तो दारू पिऊन कसा झिंगून गेला आहे.

**पहिली मुलगी:**—काय! तो प्याला नाहीं असं मला वाटलं!

**दुसरी मुलगी:**--सर्व लोकांना देत देत त्याची पाळी येईपर्यंत तो प्याला नसेल!

**पहिली मुलगी:**—हें पहाच. तो गवत नेण्याकरितां आला असेल. पहा, त्याच्या हातांत दोर आहे व तो तसाच झोंपीं गेला आहे.

**दुसरी मुलगी:**--(कानोसा घेत) ते अद्याप[1] स्तुतिगीतेंच गात आहेत. म्हणून मला वाटतं नवरानवरींना अद्याप आशीर्वाद देण्यांत आला नसेल! लोक म्हणतात अकुलिनाच्या डोळ्यांतून टिपूसहि आलं नाहीं.[2]

---

१ रशियन शेतकऱ्यांच्या लग्नसमारंभांत वधूवरांच्या स्तुतिपरगीतें गाण्यांत येतात. त्या चालीला उद्देशून वरील उद्गार काढण्यांत आले आहेत.

२ आपल्या कौमार्याचा आतां भंग होणार हें जाणून वधूनें शोक करावा अशी सामान्य चाल आहे.

**पहिली मुलगी:**—तिच्या इच्छेविरुद्ध हें लग्न लावण्यांत येत आहे असं आई म्हणत होती. तिच्या सावत्र आईनं तिला धमकावली म्हणतात, नाहीं तर तिनं कुणाचीहि पर्वा केली नसती! तिच्याबद्दल लोक काय बोलतात, हें तर तुला माहीतच आहे.

**मरीना:**—(मुलींना गांठून) कां कसं काय आहे?

**मुली:**—कां, तुझं कसं काय आहे?

**मरीना:**—कां, लग्नाला चालला आहां ना!

**पहिली मुलगी:**—लग्न बहुतेक आटपलंच आहे. आम्ही उगीच आपल्या पहायकरितां आलों होतों.

**मरीना:**—माझ्या त्या म्हाताऱ्या माणसाला मी बोलावलं आहे म्हणून सांगाल कां? झूवो गांवचा तो सायमन; तुम्हांला तो माहीतच आहे.

**पहिली मुलगी:**—हो, माहीत आहे तर. तो नवऱ्या मुलाचा नातेवाईक आहे वाटतं?

**मरीना:**—होय, तो त्या म्हाताऱ्याचा पुतण्या.

**दुसरी मुलगी:**—मग तूंच कां जात नाहींस? लग्नाला तुला जायचंच नाहीं असं कांहीं!

**मरीना:**—माझ्या मनांत लग्नाला यायचं नव्हतंच. अन् यायला वेळहि नव्हता. आतां आम्हांला घरीं जायला पाहिजे होतं, आम्हांला लग्नाला यायचं नव्हतंच. आम्ही शहरांत ओट घेऊन चाललों होतों. फक्त घोड्यांना चारापाणी करण्याकरितां इथं थांबलों. अन् माझ्या म्हाताऱ्याला त्यांनीं आंत बोलावून नेलं!

**पहिली मुलगी:**—तुम्ही मग कुठं उतरलां आहां? फेडरोविश यांच्या घरीं?

**मरीना:**—होय. तर मग मी इथं उभी राहतें. तूं आंत जा व माझ्या म्हाताऱ्याला बाहेर बोलावून घेऊन ये. जा बाळ, जा, माझे लाडके, अन् त्याला सांग कीं, "तुमची बायको तुम्हांला बाहेर बोलावीत आहे. आतां

आपल्याला गेलंच पाहिजे," असं ती म्हणत आहे. त्याचे जोडीदार गाड्या जुपूं लागले.

**पहिली मुलगी**:—बरं, ठीक. तूं आंत जाणारच नसशील तर मी जाऊन सांगतेंच.

[ मुली आंत घराकडे जातात. गाण्याबजावण्याचा आवाज ऐकूं येतो. ]

**मरीना**:—(एकटी विचार करीत उभी असते.) मी आंत गेलें असतें. पण तसं करावंसं वाटत नाही. त्यानं मला तोंडघशीं पाडल्यापासून पुन्हां त्याला मी पाहिलंसुद्धां नाही. त्याला आतां वर्ष होऊन गेलं. पण तो आतां अनीशा-बरोबर तरी कसा काय राहतो हें पहायला सांपडलं असतं तर बरं झालं असतं. त्यांचंहि कांहीं जमत नाहीं असं लोक म्हणतात. ती बाई तर रुक्ष आहे व स्वत: घमेंडखोरहि आहे. त्याला माझी बऱ्याच वेळां आठवण झाली असली पाहिजे. आपल्याला चैनींत राहतां येईल या कल्पनेनं त्यानं बेत बदलला. पण देव त्याचं भलं करो, त्याचं वाईट व्हावं अशी इच्छा मी कधीहि केली नाहीं ! त्या वेळेला मात्र मला वाईट वाटलं. काय सांगूं ! माझ्या अंत:करणाला त्या वेळीं वेदना झाल्या ! आतां ती आठवण मागें पडली आहे. तो प्रसंग मी आतां विसरूनहि गेलें आहे. पण तो मला भेटला असता तर बरं झालं असतं. ( झोंपडीकडे पाहते व निकिटा तिला दिसतो.) तो पहा, तो इकडेच येत आहे. त्या मुलींनीं त्याला सांगितलं कीं काय ? आपल्या पाहुण्यांना सोडून तो इकडं कसा आला ? मी आपली इथून जातेंच. (निकिटा येतो. त्यानें आपली मान खालीं घातलेली असते व तो आपल्याशींच बडबडत असतो.) अन् तो इतका उदासवाणा कां दिसत आहे ?

**निकिटा**:—( निकिटा मरीनाकडे पाहतो व तिला ओळखतो.) मरीना, माझ्या जिवलग मैत्रिणी, माझी लहानगी मरीना ! तुला काय पाहिजे ?

**मरीना**:—मी आपल्या म्हाताऱ्याला बोलावण्याकरितां इकड आलें.

**निकिटा**:—तूं लग्नाला कां नाहीं आलीस ? तुला सगळी परिस्थिति दिसून आली असती व माझी दुर्दशा पाहून तुला हंसूंहि आलं असतं.

**मरीना**:—मीं काय म्हणून हंसावं ? मी आपल्या नवऱ्याकरितां इथं आलें.

**निकिटा**:—हा ! जिवलगे, मरीना ! ( तिला आलिंगन देण्याचा प्रयत्न करतो.)

**मरीना**:—(रागानें बाजूला होते. ) निकिटा, असल्या चेष्टा तूं आतां सोडून दे ! मागं जें झालं तें होऊन गेलं. मी आपल्या नवऱ्याकरितां इथं आलें आहे. तो तुझ्या घरांत आहे कां ?

**निकिटा**:—म्हणजे मीं आतां मागचं सर्व विसरून गेलं पाहिजे. मला ती आठवण तूं होऊं देणार नाहीस !

**मरीना**:—गतकालाचं स्मरण करण्यांत अर्थ नाहीं ! जें काय झालं तें होऊन गेलं !

**निकिटा**:—अन् पुन्हां तसं कधीं घडून येणार नाहीं ! असंच तुझं म्हणणं कीं नाहीं ?

**मरीना**:—होय, पुन्हां तसं कधीं घडून येणार नाहीं. पण असा तूं उठून कां आलास ? तूं तर यजमान, अन् मेजवानी चालली असतांना असं उठून यायचं ?

**निकिटा**:—(गवतावर बसतो.) मी कां उठून आलों ! हें तुला ठाऊक असतं तर तुला माझ्या मनाची थोडी तरी कल्पना.......मी करंटा आहें, मरीना, मी इतका पापी आहें कीं, मला हें सर्व डोळ्यांनीं पाहवत नाहीं, म्हणून मी टेबलाजवळून उठलों, अन् इकडं निघून आलों ! लोकांना टाळण्याकरितां मी इकडं आलों. मला ते कोणीसुद्धां डोळ्यापुढें नको आहेत.

**मरीना**:—( थोडेंसें त्याच्याजवळ येऊन ) हें असं काय म्हणून झालं ?

**निकिटा**:—त्याचं कारण असं कीं, मी जेऊं लागलों कीं, माझ्या डोळ्यांसमोर तें उभं राहतं. मी पिऊं लागलों कीं माझ्या डोळ्यांसमोर तें दिसूं लागतं. मी निजलों कीं माझ्या डोळ्यांसमोर तें मला दिसूं लागतं ! मी त्याला इतका कंटाळून गेलों आहे कीं, कांहीं विचारूं नकोस. लहानगे मरीना, या सर्वाचें कारण हें कीं, मी अगदीं एकटा झालों आहे. माझ्या या दुःखांत मला कोणी वांटेकरी नाहीं.

**मरीना**:—निकिटा, आतां तुझ्या आयुष्यांत दुःखाशिवाय कांहीं राहिलेलं नाही. माझं दुःख मीं रडून रडून नाहींसं केलं. अगदीं नाहींसं केलं.

**निकिटा**:—तें पहिलं, तें आपलं जुनं दुःख तूं रडून नाहींसं केलं असशील. पण माझं दुःख आतां इथपर्यंत !..... (गळ्याला हात लावून दाखवितो.)

**मरीना**:—पण हें असं कां झालं ?

**निकिटा**:—कां झालं ! मी आतां जिवालाच कंटाळलों आहे ! माझा जीव मला अगदीं नकोसा झाला आहे ! मरीना ! मला आपल्या अंकितच ठेवायचं हें तुला कसं कळलं नाहीं ! तूं माझा घात केलास अन् स्वतःचाहि घात करून घेतलास. हें काय जगणं आहे ?

**मरीना**:—(कोठाराजवळ उभी राहून रडूं लागते पण थोडक्याच वेळांत तें आवरते.) माझ्या जीवनासंबंधानं निकिटा, मी तक्रार करीत नाहीं. ईश्वर करो, अन् प्रत्येकाला माझ्यासारख्याच जीवनाचा लाभ होवो ! त्या वेळीं माझ्या म्हाताऱ्याजवळ मीं सर्व गोष्टी कबूल केल्या व त्यानं मला क्षमा केली. अन् तो मला आतां दोष देत नाहीं. माझ्या जीवनाबद्दल मी आतां असंतुष्ट नाहीं. माझा म्हातारा शांत आहे. त्याला मी आवडतें. त्याच्या मुलाची मी काळजी घेतें, त्याच्या कपड्यालत्त्यांची व्यवस्था करतें, ते धुऊन स्वच्छ ठेवतें. तो खरोखरच मला प्रेमानं वागवितो. त्याच्याविरुद्ध मीं काय म्हणून तक्रार करावी ? ईश्वराचीच तशी इच्छा होती असं दिसतं. पण तुला आतां काय झालं आहे ? तूं चांगला श्रीमंत ........

**निकिटा**:—काय माझें जीवन ! ... या लग्नाच्या मेजवानींत विघ्न आणूं नये म्हणून नाहीं तर ही दोरी मीं अशी घेतली असती. (गवतावर पडलेली दोरी घेतो.) त्या तुळईवर ती मीं टाकली असती, तिच्या टोंकाला फांस तयार केला असता, तुळईवर चढलों असतों, गळ्यांत तो फांस अडकवून घेतला असता व खालीं उडी मारली असती ! माझं जीवन अशा प्रकारचं आहे !

**मरीना**:—बस, पुरे कर ! देव तुला सुबुद्धि देवो !

**निकिटा**:—तुला वाटतं मी थट्टाच करीत आहें ! तुला वाटतं, मी दारू प्यायलों आहे मी प्यायलेलों नाहीं. दारूदेखील आज माझ्यावर कांहीं परिणाम करूं शकत नाही. दुःखानं व विषादानं मला आज खाऊन टाकलं आहे, पूर्ण खाऊन टाकलं आहे यामुळं मला कशाचीहि पर्वा राहिलेली नाहीं. हें पहा, लहानगे मरीना, मी तुझ्यावर प्रेम करीत होतों तेवढेच काय ते माझे दिवस सुखाचे गेले. रेल्वेस्टेशनवर आपण असतांना आपण रात्रींच्या रात्री किती मजेनं घालविल्या हें तुला आठवतं ना ?

**मरीना**:—नको, त्या मागच्या आठवणी काढूं नको ! निकिटा, माझ्या अंतःकरणाला झालेल्या दुःखाच्या जखमा नको पुन्हां ताज्या करूं ! कायदेशीर रीतीनं मी आतां दुसऱ्या माणसाशीं विवाहबद्ध झालें आहें. माझ्या पापांची त्यानं मला क्षमा केली आहे. आतां माझ्या संसारांत माती कालवूं नकोस !

**निकिटा**:—माझ्या मनाला आतां मी काय करूं ? त्याला कोणाकडे घेऊन जाऊं ? त्याला कोठें विश्रांति मिळेल ?

**मरीना**:—यांत काय आहे ? यांत अडचण कसली आली आहे ? तुला चांगली बायको मिळाली आहे. आतां दुसऱ्या बायकांकडे पाहण्याची काय गरज ? तुझ्या बायकोबरोबरच तूं प्रामाणिकपणानं रहा ! तूं अनीशावर प्रेम करीत होतास. मग आतांहि तसंच प्रेम करीत रहा.

**निकिटा**:—ओ, हो, ती अनीशा, एकाद्या भुंग्याप्रमाणं तीच तर माझं अंतःकरण कुरतडीत आहे. रानवेलीप्रमाणं माझ्या पायांना विळखा घालून तिनं मला जखडून टाकलं आहे.

**मरीना**:—ती कशीहि असो, ती तुझी बायकोच आहे. पण या वायफळ गोष्टी बोलून फायदा काय ? जा, पाहुण्यांचा समाचार घे. अन् माझा नवरा तिथं आहे त्याला इकडं माझ्याकडं पाठवून दे.

**निकिटा**:—हो, माझे लाडके, तुला सर्व भानगडी कळल्या असत्या तर........पण जाऊं दे. बोलण्यांत कांहीं अर्थ नाहीं.

[ मरीनाचा नवरा प्रवेश करतो. दारू पिऊन लालबुंद झालेला असतो. त्याच्याबरोबर नानी असते.]

**मरीनाचा नवरा:**--मरीना, मरीनाबाई, माझी म्हातारी बाईल ! तूं इथं आहेस कां !

**निकिटा:**--तो पहा, तुझा नवरा तुला हांका मारीत आहे. जा.

**मरीना:**—अन् तूं !

**निकिटा:**—मी ? मी इथंच या गवतावर थोडं पडतों. ( गवतावर निजतो. )

**नवरा:**--मग ती आहे कुठं !

**नानी:**—ती तिथं कोठाराजवळ आहे.

**नवरा:**—तूं तिथं का उभी आहेस ? चल, मेजवानीला चल. तूं तिथं यावं व त्यांचा पाहुणचार घ्यावा अशी यजमानांची इच्छा आहे ! वऱ्हाडी मंडळी आतां इतक्यांतच बाहेर पडणार आहेत. त्यांच्याबरोबर आपणहि जाऊं.

**मरीना:**—मला आंत जावंसं वाटलं नाहीं म्हणून मी आंत गेलें नाहीं.

**नवरा:**—चल आंत, मी सांगतों ना ! तो आमचा पुतण्या, लुच्चा पीटर, त्याच्या नांवचा एक दारूचा पेला तरी घे. तसं केलं नाहीस तर यजमानाला तें बरं वाटणार नाहीं. आपल्या कामाला अद्याप बराच वेळ आहे ! ( मरीनाचा नवरा तिच्या खांद्यावर हात टाकतो व तिच्या खांद्यावर हात टाकून रेंगाळत चालतो. )

**निकिटा:**—(गवतावर उठून बसतो.) हा, हा ! ती माझ्या दृष्टीस पडल्यामुळें माझं जीवित मला पूर्वीपेक्षांहि अधिक तिरस्करणीय वाटूं लागलं आहे. खरंच, तिच्यावर प्रेम करीत असतांना व तिच्याजवळ रहात असतांना माझे जे दिवस गेले ते अत्यंत सुखाचे गेले. इतकं सुख मला दुसऱ्या कोणाकडूनहि मिळालं नाहीं. आपल्या आयुष्याचा मीं व्यर्थ नाश करून घेतला ! स्वतःच मीं आपला घात करून घेतला ! (पुन्हां निजतो.) मी आतां कुठं

जाऊं ? भूमाता दुभंग होऊन मला आपल्या पोटांत घेईल तर किती बरं होईल ?

**नानी**.--( निकिटाला पाहते व त्याच्याकडे धांवत जाते.) दादा ! दादा ! ते तुमचा शोध करीत आहेत. तिच्या धर्मपित्यानं व इतर सर्वांनीं तिला आशीर्वाद दिला. तुम्ही तिथं नसल्यामुळं ते खरोखर रागावले आहेत.

**निकिटा** :--( स्वगत) मी आतां कुठं जाऊं ?

**नानी**:---काय ! काय म्हणतां ?

**निकिटा**:—मी कांहीं म्हणत नाहीं. चल, चालती हो !

**नानी**:--दादा ! चला ना ? मी तुम्हांला बोलावण्याकरितां आलें आहे. (निकिटा स्तब्ध राहतो. नानी त्याचा हात धरून त्याला ओढते.) दादा ! चला आणि त्यांना आशीर्वाद द्या ना ! खरंच सांगू ? ते अत्यंत रागावले आहेत. सर्व व्याहीमंडळी आपापसांत कुरकुर करीत आहेत.

**निकिटा**:—(आपला हात ओढून घेतो.) जा, मी येत नाहीं. मला इथं एकटं बसायचं आहे !

**नानी**:—म्हणजे ? हें आहे काय ?

**निकिटा**:—(हातांत दोरी घेऊन तिला दरडावतो.) जा ! मी काय सांगतोंय ! कां पाहिजेत कां दोन रट्टे ?

**नानी**:—मग मी आईलाच पाठवितें. (धांवत जाते.)

**निकिटा**:--( उठतो.) मी जाऊं कसा ? ती पवित्र ख्रिस्ताची मूर्ति मी आपल्या हातांत घेऊं कशी ? तिच्या नजरेला नजर मी कशी देऊं ? ( पुन्हां निजतो.) हो ! हो ! पृथ्वी दुभंग झाली असती तर मीं त्यांत उडीच घेतली असती. मग मलाहि कुणीं पाहिलं नसतं व मींहि कुणाला पाहिलं नसतं. ( पुन्हां उठतो.) नाहीं ! मी जाणार नाहीं !........ते सगळे मरूं देत. मी जाणार नाहीं ! (दोरी हातांत घेतो. फांस तयार करतो व तो गळ्याला लावून पाहतो.) बस्, हाच मार्ग !

**निकिटाः**—होय, पण तें त्या तळघरांत काय आहे ?

**मॅट्रियोनाः**—( हंसते. ) तळघरांत काय ? तळघरांत कोबी, बटाटे आणि दुसरं काय असायचं ! झालं तें होऊन गेलं. त्याची आतां आठवण करून करायचंय काय ?

**निकिटाः**—तें मी विसरून गेलों असतों तर किती तरी बरं झालं असतं. पण मला त्याचा विसर पडत नाहीं. ते विचार जेव्हां माझ्या डोक्यांत येऊं लागतात, त्या वेळीं जणू कांहीं मी त्याचा आवाज....हाय, हाय ! तूं मला काय करायला लावलंस !

**मॅट्रियोनाः**—आता तूं हें काय बडबडत आहेस ?

**निकिटाः**—( मान खालीं घालतो. ) आई ! माझा असा छळ करूं नकोस. माझं दुःख आतां इथपर्यंत आलं आहे. (गळ्याला हात लावतो.)

**मॅट्रियोनाः**—तें कांहीं असलं तरी तुला गेलंच पाहिजे व आशीर्वाद दिलाच पाहिजे. लोक आत्तांच बोलूं लागले आहेत, " घरचा धनी तर निघून गेला. तो येईल असं दिसत नाहीं. आशीर्वाद देण्याइतकं धाडस त्याला होत नाहीं, असं दिसतं." लोक काय, वाटेल ते तर्क करणारच. ते कशाचा संबंध कशाशीं तरी लावून देणारच. तुला त्यांनीं जेव्हां घाबरलेला पाहिला तेव्हां ते अर्थातच नानाप्रकारचे तर्क करूं लागले. " धीटपणानं पुढं छाती करून चालणाऱ्या चोराचा कोणी हि संशय घेत नाहीं." पण तूं आतां काय करतोस पहा ! आगींतून निघून फोंफाटयांत पडणार ! बाळ, काय सांगूं ! असलं काहीं करूं नकोस. धीर सोडूं नकोस. नाहीं तर ते अधिकाधिकच संशय घेऊं लागतील.

**निकिटाः**—आई, आई, तूं मला अगदीं पेंचांत टाकलं आहेस !

**मॅट्रियोनाः**—जाऊं दे, तसलं कांहीं बोलूं नको. मी सांगतें. चल अन् शिष्टाचाराप्रमाणं त्यांना आशीर्वाद दे. म्हणजे सर्वच भानगड एकदांची मिटून जाईल !

**निकिटाः**—( खालीं मान घालून निजतो.) माझ्या हातून हें होणं नाहीं.

**मॅट्रियोना:**—(स्वगत) याला झालं तरी काय समजत नाहीं. इतका वेळ सर्व कांहीं ठीक चाललं होतं अन् त्याला एकदम असं झालं तरी काय? मला वाटतं त्याला कोणीं चेटूक केलं असेल. ऊठ निकिटा, पहा! अनीशाहि इकडं येत आहे; व्याहीमंडळींना सोडून तीहि इकडे आली!

[ अनीशा प्रवेश करते. तिनें चांगला पोषाख केलेला असतो. दारू पिऊन लालबुंद झालेली दिसते. ]

**अनीशा:**—माई, फार छान्, सगळं कांहीं यथास्थित झालं. व्याही मंडळी तर खूष होऊन गेली....पण तो कुठं आहे?

**मॅट्रियोना:**—तो इकडं आहे. तो तिथं गवतावर पडून राहिला आहे! त्याची तिकडं यायची इच्छा नाहीं.

**निकिटा:**—(आपल्या बायकोकडे पहात) हें पहा, ही सुद्धां दारू पिऊन झिंगून गेली आहे. हिला पाहिलं म्हणजे माझ्या अंगाचा तिळपापड होऊन जातो. हिच्या बरोबर कोण राहूं शकणार? (बाजूला तोंड फिरवितो) एकाद दिवशीं मी हिलाहि ठार करीन. मग हें प्रकरण अधिकच बिघडून जाईल!

**अनीशा:**—पहा तर खरं, गवतावर तो कसा सपशेल पडून राहिला आहे. हा दारूचाच परिणाम! (हंसते.) तुझ्याजवळ त्या गवतावर निजण्यासहि मला कांहीं वाटणार नाहीं पण आतां मला वेळ नाहीं! चल, तुला मी आंत घेऊन जातें. घरांत किती मजा चालली आहे. फारच मजा चालली आहे! गाणंन् बजावणंन् मजाच मजा! त्या बायका तर किती छान गाताहेत! सगळ्या झिंगून गेल्या आहेत. सगळं कांहीं अदबशीर, सगळीकडे मजाच मजा!

**निकिटा:**—काय कसली मजा चालली आहे?

**अनीशा:**—हा आपल्या इथं चाललेला लग्नसमारंभ! किती तरी आनंदाचा हा प्रसंग! इतकी मजा कोणाच्याहि लग्नांत झाली नाहीं, असं लोक म्हणतात. सगळी मोठमोठी शिष्ट मंडळी आली आहेत. सगळीकडं आनंदी-

आनंद दिसत आहे! चल, आपण दोघं मिळूनच आंत जाऊं. मी दारू घेतली आहे पण तुला मी तिकडं घेऊन जाईन. ( त्याचा हात धरते. )

**निकिटा**:—( झटक्यानें हात मागें ओढून घेतो. ) जा, तूं एकटी जा. मला वाटलं तर मी जाईन!

**अनीशा**:—उगाच काय बडबड चालविली आहेस? आपल्या मागची सगळी कटकट आतां नाहींशी झाली आहे. आपणा दोघांच्या सुखामध्यें जें विघ्न आलं होतं तें आपण दूर सारलं आहे. आतां आपल्याला मजेनं रहायला कांहींच हरकत नाहीं. अन् पुन्हां कसं अन्नूनं व कायदेशीर रीतीनं! मला इतका आनंद झाला आहे की, कांहीं पुसूं नको. शब्दांनीं मला तो सांगतां येत नाहीं. जसं कांहीं माझं तुझ्याशीं पुन्हां लग्नच होत आहे असं मला वाटत आहे. अन् लग्नाला आलेली मंडळी तर अगदीं खूष झाली आहे. ते सर्व आमचे आभार मानीत आहेत. सर्व मोठमोठी मंडळी आली आहे. इव्हॅन मोसेविश आहेत. पोलिस हपिसर आला आहे अन् ते सर्व गात आहेत व मजा करीत आहेत! अन् ते सर्व आपलीं स्तुतिस्तोत्रं गात आहेत.

**निकिटा**:—मग तूं त्यांच्यापाशीं तिथंच कां बसून राहिली नाहींस! इकडं कशाकरितां आलीस?

**अनीशा**:—खरंच. मला परत गेलंच पाहिजे. नाहीं तर लोक काय म्हणतील? "यजमान आणि यजमानीण पाहुण्यांना टाकून तसेच निघून गेले," असं म्हणतील! आणि हे पाहुणे सुद्धां असे तसे नाहींत. चांगली मोठमोठी मंडळी आहेत.

**निकिटा**:—( उठतो व आपल्या अंगाला लागलेलें गवत काढूं लागतो. ) जा, हा मी येतोंच.

**मॅट्रियोना**:—पहा तर खरं. तरुण पोरीचं हा ऐकतो. मला म्हातारीला कोण विचारणार? मीं सांगितलेलं त्यानं ऐकलं नाहीं. पण आपल्या बायकोच्या मागून मात्र ताबडतोब जायला तयार झाला ( मॅट्रियोना व अनीशा जाण्याकरतां वळतात. ) बरं, तूं येतोस ना?

**निकिटा:**—हा मी आलोंच तुमच्या मागोमाग. मी येतों आणि त्यांना आशीर्वाद देतों. ( बायका थांबतात. ) चला, मी आलोंच! हं चला! थांबतां काय? ( बायका बाहेर जातात. खालीं बसतो व पायांतले बूट काढतो. ) होय. मी जायला बसलोंय ! मी आतां त्यांना तुळईवरच दिसेन. गळयाला फांस अडकवून घेईन आणि खालीं उडी मारीन. मग तुम्ही मला पहात बसा. दोरी तर इथं पडलीच आहे. (विचार करतो.) याहि दु:खाला मीं मागं सारलं असतं; अगदीं विचार देखील केला नसता. परंतु या दुःखानं माझ्या अंत:करणाचा ठाव घेतला आहे. मीं जरा सुद्धां बाजूला सरूं शकत नाहीं. (परडयाकडे पाहतो.)खचित ती आतां पुन्हां मागं परत येणार नाहीं. (अनीशाची नक्कल करून) "छान! छान! मी गवतावर तुझ्या जवळच निजलें असतें." भिकारडी कुठली! आहे म्हणावं, मी इथंच आहें! तुळ-ईवरून जेव्हां मला खालीं काढतील त्या वेळेला मला येऊन कडकडून भेट. आतां हा येवढाच मार्ग शिल्लक आहे. (दोरी हातांत घेतो व ओढूं लागतो.)

[दारू पिऊन झिंगलेला मिट्रिश उठून बसतो व दोरी सोडीत नाहीं. ]

**मिट्रिश:**—नाहीं, दोरी देणार नाहीं. कुणालाहि दोरी घेऊं देणार नाहीं. मी स्वत:च तें घेऊन येईन. मीच गवत आणीन असं म्हटलं होतं आणि तसं मी करीन! निकिटा, कोण तूं निकिटा! (हंसतो.) काय! गवत नेण्याकरितां तूं इथं आलास? खूपच झाली म्हणायची!

**निकिटा:**—दे. ती दोरी इकडे मला दे.

**मिट्रिश:**—नाहीं. थोडा थांब. शेतकऱ्यांनीं मला गवत आणण्याकरितां इकडं पाठविलं आहे. मी तें आणीन···· (उठून बसतो. गवत गोळा करूं लागतो व झिंगून खालीं पडतो.) दारूनं मला बेजार करून टाकलं आहे. आज तर फारच चढली.

**निकिटा:**—दे! ती दोरी मला दे.

**मिट्रिश:**—नाहीं, मी देणार नाहीं! तुला मीं काय इतका वेळ सांगितल? निकिटा! ए निकिटा! अगदीं डुकरासारखा मूर्ख आहेस. (हंसतो.) तुझ्यावर माझं प्रेम आहे, पण त्याची तुला काय किंमत! तूं मूर्ख आहेस. मी दारू

प्यायलों आहे. हें तर तुला दिसतंच आहे. सैतानानं तुला झडपलं! मला तुझी गरज आहे असं तुला वाटतं?—पहा, माझ्याकडं पाहून तरी घे! मी एक नॉन—मूर्ख, तसंच कांहीं म्हणतां यायचं नाहीं. राणीच्या ग्रेनेडियर गार्डच्या पहिल्या रेजिमेंटचा मी नॉन् कमिशन्ड ऑफिसर आहें. मी झारची सेवा केली आहे तशीच देशाची सेवा केली आहे. मी खरा राजनिष्ठ व प्रामाणिकहि आहें. पण मी आहें कोण? मी एक मोठा योद्धा आहें असं तूं मला समजत असशील नाहीं? मी योद्धा नाहीं. मी एक अगदी क्षुद्र मनुष्य आहें. एक गरीब, पतित, अनाथ मनुष्य आहें. दारू न पिण्याची मीं शपथ घेतली. अन् आतां मी तंबाखू ओढीत आहें. अन्—बरं, पण मी तुला भितों असं तर तू समजत नाहींस? भीतीचं नांवहि काढूं नको. मला कुणाहि माणसाची भीति वाटत नाहीं. मला दारूचं व्यसन लागलं आहे व ती मी पीत राहणार! आतां मी पंधरा दिवस अशीच दारू पीत राहीन. खूप पीत राहीन. माझ्या जवळचा शेवटला शर्टहि विकून हो दारू पिईन. माझी टोपी विकूनहि मी दारू पिईन. माझा पासपोर्ट मी गहाण टाकीन व दारू पिईन; मला कुणाचीहि भीति वाटत नाहीं लष्करांत असतांना मीं दारू पिण्याचं बंद करावं म्हणून मला फटके मारण्यात आले. त्यांनीं मला फटकाऱ्यांवर फटकारे लगावले. "कां, दारू सोडतोस कां नाहीं?" त्यांनीं मला विचारलं. "नाहीं" असं मीं त्यांना सांगितलं. मीं त्यांना काय म्हणून भ्यावं? मी आहें हा असा आहें. देवानं मला असं निर्माण केलं आहे. दारू न पिण्याची शपथ घेतली व ती मीं सोडून दिली. आतां मी दारू प्यायला लागलों तेव्हां मी ती पीतच राहीन! मला कुणाहि माणसाची भीति वाटत नाहीं. माणसाला मी भीत नाहीं. कारण असं कीं मी खोटं बोलत नाहीं. पण खरंच पाहिलं तर एकाद्यानं माणसाची काय म्हणून पर्वा करावी? त्यांना काय म्हणून भ्यावं? असल्या शेणगोळ्यांना काय म्हणून भ्यावं? "तूं आतां इथं आलास?" पण तुला भ्यायचं कारण काय? मी हा असा आहें. मी असंच वागणार! एका पाद्र्यानं मला सांगितलं कीं, सैतान हा सर्वांत मोठा घमेंडानंदन आहे. त्याचं म्हणणं असं कीं, "ज्या वेळी तुम्ही आत्मप्रौढी गाऊं लागतां त्या वेळीं तुम्ही भिऊं लागता अन् ज्या वेळीं तुम्ही माणसांना भिऊं लागतां त्या वेळीं सैतान तुमच्या मानगुटीला

धरतो व तुम्हांला वाटेल तिकडे तावडीत नेतो." पण ज्याअर्थी मी माणसांना भीत नाहीं त्याअर्थी मी स्वस्थ व निश्चित आहें. सैतानाच्या तोंडावरहि मी थुंकूं शकतों. माझें तो कांहींहि वांकडें करूं शकत नाहीं! पहा, ही गोष्ट नीट लक्ष्यांत ठेव.

**निकिटा**:--( क्रॉसचें चिन्ह करून ) अगदीं खरं आहे. मी काय करणार होतों? ( दोरी खालीं टाकतो. )

**मिट्रिश**:--काय?

**निकिटा**:--( उठतो. ) माणसांना भिऊं नकोस असं तूं मला सांगतोस.

**मिट्रिश**:--असल्या शेणाच्या बाहुल्यांना तूं कां भ्याव? सगळे एकाच माळेचे मणी. एकाचें पोट मोठं, एकाचें पोट सडपातळ, येवढाच फरक! असल्या लोकांना भिण्याचं कारण काय? यांना आपण भ्यावं म्हणे! मरूं दे त्यांना! त्यांची पर्वा करूं नको.

**मॅट्रियोना**:--( परड्याच्या बाजूकडून ) बरं, तूं येतोस ना?

**निकिटा**:—होय, असंच करणं अधिक चांगलं. मी आलोंच. ( परड्याकडे जाऊं लागतो. )

---

## प्रवेश २ रा

[ झोंपडीतील आंतला भाग. लोकांची आंत गर्दी झालेली असते. कांहीं टेबलाभोंवतीं बसलेले असतात व कांही उभे असतात. समोरच्या कोंपऱ्यांत अकुलिना आणि नवरा मुलगा असतो. एका टेबलावर ईश्वरप्रतिमा व राय धान्याच्या पिठाची भाकरी ठेवलेली असते. मरीना, तिचा नवरा, एक पोलिस ऑफिसर, गाडीवान, लग्नें जुळवून देणारा मध्यस्थ भटजी व सरपंच वगैरे लोक या जमलेल्या मंडळींत प्रामुख्यानें दिसतात. बायका गात असतात. अनीशा मद्य वांटीत असते. गाणें थांबतें. ]

**गाडिवान**:--आपल्याला जर जायचंच आहे तर चला ना! चर्च कांहीं इतकं जवळ नाहीं.

**सरपंच**:--ठीक आहे. सात्त्र बाप येऊन आशीर्वाद देईपर्यंत थोडं थांबा. पण तो आहे कुठं ?

**अनीशा**:--तो येत आहे. आतां इतक्यांत येईल. तोंपर्यंत आणखी एकादा पेला घ्याना! नाहीं म्हणू नका.

**मध्यस्थ**:--इतका उशीर काय म्हणून ? आम्ही केव्हांची वाट पहात बसलों आहों.

**अनीशा**:--आलाच, थेट इकडेंच येत आहे. आतां इतक्यांत येईल. आतां बोलतां बोलतां येईल. घ्या, घ्या, आणखी एक एक पेला घ्या. इतक्यांत आलाच. गा, आणखी थोडं गा ना!

**गाडीवान**:--त्यांचीं गाणीं सर्व संपलीं. त्या वाट पाहून पाहून कंटाळल्या आहेत.

[ बायका गातात. निकिटा व अकीम त्याच वेळीं प्रवेश करतात. ]

**निकिटा**:--( आपल्या बापाचा हात धरतो व त्याला आपल्या पुढें जावयास लावतो. ) चला बाबा, तुमच्याशिवाय माझं कांहीं चालायचं नाहीं.

**अकीम**:--मला ही भानगड नको. काय म्हटलं ?

**निकिटा**:--( बायकांकडे पाहून ) बस, पुरे करा. गडबड करूं नका. ( झोंपडींत सभोंवार पाहतो. ) मरीना, तूं इथं आहेस ना ?

**मध्यस्थ**:--जा, ती प्रतिमा हातांत घे व आशीर्वाद दे.

**निकिटा**:--थोडं थांबा. ( सभोंवतीं पाहतो. ) अकुलिना, तूं इथं आहेस ना !

**मध्यस्थ**:—प्रत्येकाला असा हांका मारीत कां सुटला आहेस ? ती असणार कुठं ? तो किती विचित्र दिसत आहे !

**अनीशा**:--आतां तर कमाल झाली ! तो मोकळ्या पायानंच इथं आला आहे.

**निकिटा**:--बाबा, तुम्ही इथं आहांच! माझ्याकडे पहा. तुम्ही सर्व ख्रिश्चन आहां! तुम्हीहि इथं आहां. अन् मीहि इथं आहें! मी . . . ( गुड- घ्यांवर टेंकन बसतो. )

**अनीशा**:--निकिटा, प्रिय निकिटा, तुला काय झालंय काय? ओहो! माझं कपाळ, माझं कपाळ!

**मध्यस्थ**:--ही एक पंचाइतच झाली म्हणायची!

**मॅट्रियोना**:--त्यानं ती फरेंच दारू खूपच घेतली आहे! ये, शुद्धीवर ये, हें काय, करीत आहेस काय?

[लोक त्याला उठवून उभें करण्याचा प्रयत्न करतात; पण तो त्यांच्याकडे लक्ष्य देत नाहीं. तो समोर पहात राहतो.]

**निकिटा**:--ख्रिश्चन मंडळींनो! मीं पापाचरण केलें आहे. व त्याची कबुली मला द्यायची आहे.

**मॅट्रियोना**:--( त्याच्या खांद्याला हात लावून त्याला हलविते. ) काय, वेडा तर झाला नाहींस? मंडळीहो, याचं डोकं फिरलं आहे! याला आतां इथून नेलं पाहिजे.

**निकिटा**:--( तिला बाजूला सारतो ) माझं मला आतां काय तें करूं दे. अन् तुम्ही बाबा, माझं ऐका. परंतु मरीना, तूं प्रथम ऐक. इकडं पहा! ( जमिनीवर डोकें टेंकून तिला वंदन करतो व उठतो. ) तुझ्या बाबतीत मी पापाचरण केलं आहे. तुझ्याशीं लग्न करण्याचं मीं तुला वचन दिलं. तुला मीं भुरळ घातली व नंतर मीं तुझा त्याग केला. ख्राइस्टचें स्मरण कर व मला क्षमा कर. ( पुन्हां जमिनीवर डोकें ठेवून तिला वंदन करतो. )

**अनिशा**:--तूं काय ही बडबड चालविली आहेस! हें कांहीं तुला शोभत नाही. या गोष्टी समजून घेण्याची कोणालाहि गरज वाटत नाहीं. ऊठ! हा असला मूर्खपणा तुलाच शोभतो!

**मॅट्रियोना**:—हो, हो, याच्यावरहि कुणीं चेटूक केलं! तें कांहीं कां असे- ना! याला कुणीं तरी मंत्रानं भारून टाकलं यात शंका नाहीं. ऊठ, ऊठ! कसली वायफळ बडबड चालविली आहेस! (त्याला ओढते.)

**निकिटा:**—( मान हलवितो. ) मला हात लावूं नको. मरीना, तुझ्या बाबतींत मीं जें पापाचरण केलं त्याची मला क्षमा कर. खाइस्टला साक्षी ठेवून क्षमा कर.

[ मरीना आपलें तोंड आपल्या हातानें झांकून घेते व मुकाटयानें उभी राहते. ]

**अनीशा:**—ऊठ, मी काय सांगतें ! इतका बेशरम होऊं नको. तूं कसला विचार करीत आहेस ? मागच्या गोष्टीचं स्मरण करून करायचं काय ? बस, बडबड पुरे कर. हें कृत्य तर बेशरमपणाचंच आहे. अगबाई, माझं फुटकं कपाळ ! याचं तर चांगलंच डोकं फिरलं आहे.

**निकिटा:**—( आपल्या बायकोला बाजूला सारतो व अकुलिनाकडे वळतो.) अकुलिना, मी आतां तुला उद्देशून बोलत आहें ! ऐका, ख्रिश्चन मंडळीहो ऐका. अकुलिना, मी राक्षस आहें. तुझाहि मीं एक गुन्हा केला आहे. स्वाभाविक मरणानें तुझा बाप मेला नाहीं. त्याला विष घालण्यांत आलं.

**अनीशा:**—(किंकाळी फोडते ) माझं कपाळ फुटलं. तो काय बडबडतो तरी काय ?

**मॅट्रियोना:**—तो पिसाळला आहे. त्याला दुसरीकडे घेऊन जा. [ मंडळी येतात व त्याला धरूं लागतात.]

**अकीम:**—(आपल्या हातांनीं खुणा करून त्यांना मागें जावयास सांगतो.) थांबा, थांबा, पोरांनो, मी काय सांगतों आहे ? थांबा, थांबा !

**निकिटा:**—अकुलिना, मीं त्याला विष घातलं. ख्राइस्टचं स्मरण करून मला क्षमा कर.

**अकुलिना:**—( ताडकन उभी राहते. ) तो खोटं बोलत आहे. विष कुणीं घातलं हें मला माहीत आहे.

**मध्यस्थ:**—तुला आणखी काय झालं ? तूं गप्प बस ना !

**अकीम:**—देवा, देवा, शांतं पापम्, शांतं पापम् !

**पोलिस ऑफिसर:**—पकडा त्याला व पाटलाच्या ताब्यांत द्या. त्याच्यावर आरोप ठेवून साक्षिदारहि पाहिले पाहिजेत. ऊठ, चल इकडे ये.

**अकीमः**—(पोलिस ऑफिसरला उद्देशून) आतां तुम्ही आलां कां? अहो चकचकीत बटनवाले, थांबा, थोडं थांबा, बोलूं दे, त्याला काय बोलायचं तें बोलूं दे.

**पोलिस ऑफिसरः**—म्हाताऱ्या, ए म्हाताऱ्या, जपून बोल. आमच्या कामांत हरकत करूं नको! त्याच्यावर मला आरोप ठेवायचा आहे.

**अकीमः**—अरे हो, काय विचित्र लोक आहां तुम्ही! थोडं थांबा ना! काय, आरोप ठेवायचा ना! इकडं ईश्वरी कार्य सुरू झालं ... एक मनुष्य आपल्या अपराधांची कबुली देत आहे अन् तुमचं म्हणणं काय तर म्हणे ... आरोप ठेवायचे!

**पोलिस ऑफिसरः**—काय पाटील!

**अकीमः**—अगोदर हें देवाचं कार्य होऊं दे, काय म्हटलं, मग तुमचं काम तुम्ही कराच!

**निकिटाः**—अन् अकुलिना, तुझ्या संबंधांत मीं मोठंच पाप केलं आहे. मीं तुला भ्रष्ट केली. ख्राइस्टचं स्मरण करून मला क्षमा कर. (जमिनीला डोकें टेकून तिला वंदन करतो.)

**अकुलिनाः**—(टेबलाजवळून उठून बाजूला होते.) मला जाऊं दे. माझं लग्न होणं शक्य नाहीं. त्यानं मला सांगितलं म्हणून मी लग्नाला तयार झालें. आतां मी लग्न करणार नाहीं.

**पोलिस ऑफिसरः**—आतां काय बोललास तें पुन्हां बोल.

**निकिटाः**—महाराज थोडं थांबा ना, मला काय सांगायचं तें सांगूं द्या. माझं बोलणं संपूं द्या.

**अकीमः**—(आनंदानें) बोल, माझ्या बाळा, जें काय असेल तें सर्व सांग! ईश्वराजवळ आपल्या पापकृत्यांची कबुली दे. मनुष्यांना भिऊं नको. ईश्वर! ईश्वर! तोच सर्व कांहीं करीत आहे!

**निकिटाः**—बापाला मीं विष घातलं. अन् मी किती नीच! त्याच्या मुलीचाहि मीं सत्यानास केला. माझ्या विकारांना ती बळी पडली अन् मी तिचा व तिच्या पोराचा घात केला.

अकुलिना:—खरं, हें अगदीं खरं आहे.

निकिटा:—तळघरांत त्याच्यावर फळी टाकून मीं त्याला चिरडून मारून टाकलं. मी त्या फळीवर बसलों व त्याला चिरडून टाकलं. त्याचीं हाडं चिरडून गेलीं! (रडूं लागतो.) अन् त्याला मीं पुरून टाकलं. मी केलं, हें सर्व एकटयानं केलं.

अकुलिना:—तो बरळतो आहे. हें सर्व त्याला मीं करायला सांगितलं.

निकिटा:—माझा बचाव करूं नको! मी आतां कुणालाहि भीत नाहीं. ख्रिश्चन मंडळीहो, मला क्षमा करा! (जमिनीवर डोकं ठेवून सर्वांना वंदन करतो.)

[ स्तब्धता. ]

पोलिस ऑफिसर:—बांधा त्याला! लग्न तर उघडच मोडलं!

[ पोलिस आंत येतात. ]

निकिटा:—थांबा, अद्याप बराच वेळ आहे! (जमिनीवर डोकें टेकून बापाला वंदन करतो.) बाबा, प्रिय बाबा, मला क्षमा करा. मी चांडाळ आहें. मी वाईट मार्गाला लागलों त्या वेळीं तुम्हीं मला प्रथमच बजावलं होतं. "पंजा अडकून पडला कीं पक्षाचा घात झालाच," असं तुम्हीं मला त्या वेळीं सांगितलं होतं. पण मीं नीचानं तुमचं त्या वेळीं ऐकलं नाहीं. व तुम्हीं सांगितल्याप्रमाणें व्हायचा तो परिणाम झालाच. ख्राइस्टचं स्मरण करा व मला तुम्ही क्षमा करा.

अकीम:—(सहर्ष) ईश्वर तुला क्षमा करील. माझ्या बाळा! (त्याला आलिंगन देतो.) तूं आपल्या स्वत:वर दया दाखविली नाहींस तेव्हां ईश्वर तुझ्यावर दया करील! परमेश्वर, परमेश्वर! जें कांहीं आहे तें तोच आहे!

[ पाटील प्रवेश करतो. ]

पाटील—या ठिकाणीं हवे तेवढे साक्षीदार आहेत.

**पोलिस ऑफिसर:**--आपण याची ताबडतोब चौकशी केली पाहिजे.

[ निकिटाला बांधतात. ]

**अकुलिना:**--( जाते व त्याच्याजवळ उभी राहते. ) मी अगदीं खरं खरं तें सांगेन ! विचारा, मला विचारा !

**निकिटा:**--( बांधून टाकलेला ) विचारण्याची कांहीं गरज नाहीं. मीं स्वतःच हें सर्व केलं, हें सर्व करायचं मीं ठरविलं अन् मींच तें सर्व स्वतः करून टाकलं. तुम्हाला हवं तिकडं मला घेऊन चला. यापेक्षां जास्त कांहीं मी सांगणार नाहीं !

[ पडदा ]



# आदिकारण

## अंक १ ला

[ पावसाळ्याचे दिवस, शेतकऱ्यांची झोंपडी, कूड घालून तयार केलेली, तींतील एक लहान खोली. अकुलना सूत कांतीत बसली आहे. घरची कारभारीण मार्था भाकरीचें पीठ मळीत आहे. लहान पारास्का पाळण्याला झोंके देत आहे ]

**मार्था:**—अग बाई, माझी छाती जशी काय भरून आली आहे. कांहीं तरी संकट येणार खास; त्याला आवरून धरणारं असं इथं कोणी नाहीं. परवां जसं झालं तसंच आजहि होणार. सरपण विकण्याकरितां तो गांवांत गेला व मिळालेल्या पैशांपैकीं अर्धे अधिक पैसे त्यानें दारुंत उडविले. अन् घरीं पहावें तो प्रत्येक गोष्टीबद्दल तो मला नांवें ठेवीत असतो.

**अकुलिना:**—उगीच काळजी कशाला ? अजून दिवस वर यायचा आहे. हातांतल्या कामाकडे................

**मार्था:**—दिवस वर यायला काय शिंगं आहेत कां काय ? अकिमिश केव्हांच परत आला. मायकेलच्या नंतर तो गेला व परतहि आला, पण मायकेल मात्र अद्याप परत आलेला नाहीं. सबंध दिवसभर काळजी तरी किती करावी माणसानं ! हेंच काय तें सुख माझ्या कपाळीं आलं आहे.

**अकुलिना**—अकिमिश आपलं ओझं ठरलेल्या गिऱ्हाइकाकडं घेऊन गेला होता. पण माझ्या पोरानं तें बाजारांत विकण्याकरितां नेलं असेल.

**मार्था**—तो एकटाच असता कीं नाहीं तर मला कांहीं काळजी वाटली नसती. पण इग्नॅट त्याच्याबरोबर आहे. आणि त्या कुतरड्याबरोबर जेव्हां

तो असतो तेव्हां तो दारू प्याल्याशिवाय राहात नाहीं. रात्रंदिवस मर मर मरावं! सगळा कारभार माझ्या आंगावर! पण त्यांत तरी काय सुख आहे? कांहीं नाहीं! सर्व दिवसभर रखडत रहावं हेंच काय तें सुख!

[ दार उघडतें. अंगावर चिंध्या असलेल्या एका पांथस्थासह तारास प्रवेश करतो. ]

**तारासः**—नमस्कार मंडळी, रात्रींच्या मुक्कामाकरितां तुमच्या घरीं* पाहुणा आणला आहे

**पांथस्थ**—नमस्कार, नमस्कार.

**मार्था**—पुन्हां पुन्हां आमच्या घरींच काय म्हणून? परवां बुधवारीं रात्रींच एका पाहुण्याची सोय आम्हीं केली. जेव्हां पहावें तेव्हां आमच्याच घरीं तुम्ही ही मंडळी आणतां! स्टीपानियाच्या घरीं कां नेत नाहीं? त्यांच्या घरीं मुलं बाळं नाहींत, कांहीं नाहींत. घरचं झालं थोडं अन् व्याह्यानं धाडलं घोडं!

**तारास**—प्रत्येकाच्याच घरीं आळीपाळीनें पाहुणे नेत असतों.

**मार्था**—बोलायला काय जातं! म्हणे आळीपाळीनं! पण मला मुलं बाळं आहेत, शिवाय घरधनीहि आज घरी नाही.

**तारास**—कांहीं हरकत नाहीं! पाहुण्याला रात्रीं इथं निजूं दे. जमीन कांहीं झिजायची नाहीं.

**अकुलिना**—[ पांथस्थाला उद्देशून ] या आंत या, खालीं बसा आणि आमचा पाहुणचार घ्या.

**पांथस्थ**—मी आपला फार आभारी आहें. खायला कांहीं असलें तर पाहिजे आहे.

**मार्था**—अजून बसलाहि नाहीं तोंच खायला पाहिजे? गांवांतून भीक मागून कांहीं आणलं नाहीं कां?

**पांथस्थः**—[ सुस्कारा टाकतो. ] मला भीक मागण्याची संवय नाहीं. मला लाज वाटते. पण माझ्याजवळ कांहीं नसल्यामुळें.............

---

* गांवांत आलेल्या पांथस्थांची आळीपाळीनें घरोघरीं राहण्याची व जेवणाची सोय करावी, अशी रशियांतील खेडेगांवांतून चाल आहे.

[अकुलिना उठते. टेबलाजवळ जाते. पाव घेऊन त्यांतला एक तुकडा कापते आणि पांथस्थाला देते. ]

**पांथस्थः**--[ पावाचा तुकडा हातांत घेऊन ] देव तुमचं भलं करो ! [ बांकावर बसतो व आधाश्यासारखें खाऊं लागतो. ]

**तारासः**—मायकेल कोठें आहे ?

**मार्थाः**--गवताचा भारा घेऊन तो शहरांत गेला आहे. तो घरीं यायला पाहिजे होता पण कां आला नाहीं, कुणाला ठाऊक ? कांहीं तरी झालं असलं पाहिजे.

**तारासः**--काय, व्हायचंय काय ?

**मार्थाः**--काय व्हायचंय ? चांगलं कांहीं व्हायचं नाही. कांहीं तरी वेडं वाकडंच व्हायचं. तो घरांतून बाहेर पडला कीं, घरच्या मंडळींना विसरून जातो. पहा तो अगदी दारू पिऊन घरीं येईल.

**अकुलिनाः**—[ कांतण्याकरिता खालीं बसते व मार्थाकडे बोट करून तारासला म्हणते. ] ती गप्प बसायची नाहीं. तिचा स्वभावच तसा आहे. सारखी चिरचिर करते. तिला कसलंहि कारण पुरं होत असतं.

**मार्था**--तो एकटाच असता कीं नाहीं म्हणजे मग मला इतकी भीति वाटली नसती . पण इग्नाटला बरोबर घेऊन तो गेला आहे.

**तारास**-(हंसत हंसत) मग ठीकच आहे. इग्नाटला दारूचा एकादा घोट घेतल्याशिवाय चैन पडणारच नाहीं.

**अकुलिना**—इग्नाटचा स्वभाव कसा आहे, हें त्याला माहीत नाहीं कां ? इग्नाट तो इग्नाट, आमचा मायकेल त्याच्या नादाला कधीहि लागणार नाहीं.

**मार्था**--अघळपघळ बोलायला काय जातं ? पण मी तर त्याच्या या दारुड्या स्वभावाला अगदीं कंटाळून गेलें आहे. तो दारू प्यालेला नसतो त्या वेळीं त्याच्यासंबंधानं कांहीं तक्रार करणं म्हणजे पाप आहे. खरं ! पण दारू झोकलेली असली म्हणजे तो कसा ताळ सोडतो, हें तुम्हाला माहीतच आहे कोणी तोंडाबाहेर शब्द काढण्याचीही सोय नाहीं. तो आंगावरच धांवून येतो.

**तारास**—होय, पण तुम्ही बायका या गोष्टीचा विचार कसा करीत नाही? पुरुष दारूचा एकादा घोट घेतो व तो थोडा झिंगतोहि. पण एक झोंप काढली कीं, तो कसा ताजातवाना होतो. कसलेंहि काम असो त्याची त्याला दिक्कत वाटत नाही. पण तुम्ही बायका मात्र तो असा आहे तसा आहे अशीं त्याचीं उणी काढत राहतां !

**मार्था**:—तो प्यालेला असला म्हणजे त्याच्याशीं बोलण्याची सोयच नाहीं. काय पाहिजे तें करा

**तारास**:—पण केव्हां तरी एकादा घोट घेतल्याशिवाय आमचें भागत नाहीं. हें तुम्हाला समजायला पाहिजे. तुमचें बायकांचें काय, घरांत चुलीपाशीं लुडबुड करायची! पण आमच्यासारख्यांना कामावर असलें म्हणजे एकादा घोट घ्यावाच लागतो. निदान लोकांच्या भिडेखातर तरी घ्यावाच लागतो. माणूस दारू पितो त्याचें कारण हेंच आहे. पण त्यांत नुकसान तरी काय आहे ?

**मार्था**:—फुकट बोलायला काय जातें? पण सर्व यातायात आम्हाला सोसावी लागते. आमचे हाल आम्हालाच माहीत! अगदीं एक आठवडाभरच जर तुम्हाला आमच्या कामाला जुंपलं म्हणजे मग तुम्ही आमच्या बाबतींत असं कांहीं बोलणार नाही. निराळंच कांहीं बोलूं लागाल! दळण, कांडण, स्वैंपाक, सूत कांतणं, विणणं, गुराढोरांची काळजी घेणं, एक का दोन. शिवाय मुलांना संभाळायचं, त्यांना न्हाऊं घालायचं, खाऊं घालयच, त्यांचीं आंगडीं टोपडीं पहायचीं. हा सगळा बोजा आमच्या अंगावर. आणि त्याच्या लहरीप्रमाणं कांहीं थोडं झालं नाहीं कीं, मग काय विचारूं नका, दारू प्याल्यावर तर त्याच्यापुढें उभें रहाण्याचीहि सोय नाहीं जळला मेला आमचा बायकांचा जन्म !

**पांथस्थ**—( भाकरीचा घास चघळत चघळत ) अगदीं बरोबर. सर्व दुःखांचें मूळ तेंच आहे. आयुष्यांत भोगावीं लागणारीं सर्व संकटें दारूपासूनच उद्‌भवतात.

**तारास**—तुम्हालाहि तिनें हात दाखविलेला दिसतो.

**पांथस्थ**—अगदीं तसेंच केवळ नाहीं. पण दारूची सवंय लागली नसती तर माझें आयुष्य कांही निराळयाच रितीनें गेलें असतें.

**तारास**:—पण मला वाटतें दारू जर अगदीं बेतानें घेतली तर कांही नुकसान होत नाही.

**पांथस्थ**:—पण तिच्या ठिकाणी इतकें सामर्थ्य आहे कीं, ती केव्हां केव्हां माणसाचा पूर्णपणें घात केल्याशिवाय राहात नाहीं.

**मार्था**:—माझंहि तेंच म्हणणं आहे. काळजी करावी, मर मर मरावं आणि त्याच्याबद्दल सुख काय तर खांडगाळचा शिव्या खाव्या व कुत्र्यासारखं झोडपून घ्यावं.

**पांथस्थ**—एवढेंच नाही. तर अशी कांही मंडळी आहेत की दारूपायीं त्यांचा बुद्धिभ्रम होतो. आणि अगदीं करूं नये तीं कृत्यें ते करूं लागतात. माणूस दारू प्यालेला नसतो त्या वेळीं त्याला कोणतीहि वस्तू द्या, तो आपली नसेल तर तो ती घेणार नाहीं. पण दारू झोंकली की, हाताला लागेल ती वस्तु तो गडप करतो पुष्कळ वेळां यामुळे तो मार खातो व तुरुंगांतहि टाकला जातो. जोंपर्यंत मी दारू घेतलेली नसते, तोंपर्यंत सर्व कामे अगदीं प्रामाणिकपणानें व सुरळीत चाललेली असतात. पण दारू घेतली म्हणजे काय करावें आणि काय न करावें हें मला कळत नाहीं.

**अकुलिना**:—मला वाटतं, हें प्रत्येकाच्या स्वभावावर अवलंबून आहे.

**पांथस्थ**:—अर्थात् ! पण तो शुद्धीवर असला म्हणजे सर्व कांही ठीक असतें. हा एक प्रकारचा रोगच आहे.

**तारास**:—फार चांगला रोग आहे म्हणायचा. चांगलें बदडून काढलें म्हणजे हा रोग चटकन् बरा होतो. बरं आहे, नमस्कार !

[ मार्था हात पुसते व जाऊं लागते. ]

**अकुलिना**:—[ पाहुण्याच्या हातांतील भाकरी संपत आलेली पाहून ] मार्था, अग मार्था, त्याला आणखी एक तुकडा कापून दे.

**मार्था**:—जळला मेला खादाड ! मला चहाकरतां आधण ठेवलं पाहिजे.

[ अकुलिना उठते, टेबलाजवळ जाते व पावाचा एक तुकडा कापून पाहुण्याला देते ]

**पांथस्थ**:—देव तुमचं भलं करो ! मला फार भूक लागली होती.

**अकुलिना**:—तुम्ही मजूर आहां का ?

**पांथस्थ**:—कोण ? मी ? मी एंजिन ड्रायव्हर होतों.

**अकुलिना**:—तुम्हाला मजुरी काय मिळत होती ?

**पांथस्थ**:—मला महिन्याला ५० ते ७० रुबल* मिळत होते.

**अकुलिना**:—वाः चांगलीच मिळकत होती ! मग तुमची अशी वाईट स्थिति कां झाली ?

**पांथस्थ**:—काय ? वाईट स्थिति ? पण या दुर्दशेला पोंचलेला असा मी एकटाच नाहीं. हे दिवसच असे आहेत की, प्रामाणिक माणसाला जगून राहणें अशक्य झालें आहे.

**मार्था**:—[चहादाणी घेऊन आंत येते.] अरे देवा ! तो खात्रीनें अगदीं दारू पिऊन घरी येणार ! माझं मनच मला तसं सांगतं आहे.

**अकुलिना**:—तो गुत्त्यावर गेला असला पाहिजे अशी मलाहि भीति वाटूं लागली आहे.

**मार्था**:—हें अस्स आहे. माणसानं मर मर मरावं, दळावं, कांडावं, भाकरी भाजाव्या, कांतावं, विणावं, गुरांढोरांकडे पहावं, सगळा बोजा एकान सहन करावा. [ पाळण्यांत मूल रडूं लागतें. ] पारास्का, पोराला झोंका दे. काय मेला आमचा बायकांचा जन्म !........अन् तो दारू झोंकून आला म्हणजे त्याला कांही पटायचं नाहीं........त्याच्यापुढ एक शब्दसुद्धां बोलण्याची सोय नाही.

**अकुलिना**:—[ चहा तयार करून ] झालं, संपला हा शेवटचाच चहा ! येतांना तू त्याला चहा आणायला सांगितलं आहेस का ?

---

* एक रुबल अदमासें १ रु. ७ आणे.

**मार्थाः**—होय, सांगितलं आहे व तें त्यानं कबूलहि केलं आहे. पण आतां घरांतले निरोप बिरोप सर्व तो विसरून गेला असेल !...........[ चहादाणी टेबलावर ठेवते. पाहुणा बाजूला होतो. ]

**अकुलिना:**—कां, असें दूर कां जातां ? आपणाला आतां चहा घ्यायचा आहे.

**पांथस्थ:**—आपल्या या पाहुणचाराबद्दल मी आपला फार आभारी आहें. [ ओठीत असलेली सिगारेट टाकून देतो आणि टेबलाजवळ येतो. ]

**मार्थाः**—आपली जात कोणती ? शेतकरी कां आणखी कुणी ?

**पांथस्थ:**—मी शेतकरी नाहीं किंवा सुखवस्तूहि नाहीं. माझी जात दुहेरी आहे.

**मार्थाः**—म्हणजे आपलं म्हणणं तरी काय ? [ त्याला चहाचा पेला देते.]

**पांथस्थः**—त्याचें कारण असे आहे, माझा बाप पोलंडमधील एक सरदार होता. त्याच्याशिवाय आणखीहि बरेच बाप होते आणि मला आयाहि दोन होत्या.

**अकुलिनाः**—देवा, देवा ! हें असं कसं झालं ?

**पांथस्थः**—असं कसं काय ? माझी आई वेश्येचा धंदा करीत होती. त्यामुळें पुष्कळ प्रकारचे बाप तिच्या घरीं येत होते. मला दोन आया होत्या. म्हणजे जिनें मला जन्म दिला तिनें मला लहानपणींच टाकून दिलें. एका हमालाच्या बायकोला माझी दया आली व तिनें मला लहानाचा मोठा केला. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे माझें चरित्र पुष्कळ संकटांनी भरलेलें आहे.

**मार्थाः**—आणखी एक कप चहा घ्या. तुमचं कांहीं शिक्षण झालं आहे काय ?

**पांथस्थ:**—माझ्या शिक्षणाचीहि अशीच चमत्कारिक हकीकत आहे. माझ्या खऱ्या आईनें नव्हे तर माझ्या वाढविलेल्या आईनें मला एका लोहाराकडे धंदा शिकण्याकरतां उमेदवार म्हणून ठेवले. तो लोहार हा माझा पहिला पंतोजी. आपला पंतोजीपणा तो माझ्यावर खूप गाजवीत

ासे. तो ऐरणीवर जितके तडाके मारीत असे त्यापेक्षांहि जास्त तडाके ो माझ्या दुर्दैवी डोक्यावर मारी. तो माझ्या डोक्यावर कितीहि तडाके ारी तरी माझी बुद्धि कांहीं तो मारूं शकला नाहीं. नंतर मी एका कुलपें तयार करण्याच्या कारखान्यांत गेलों. माझें काम तेथें पसंत पडलें व मी फोरमन झालों. मी पुष्कळ सुशिक्षित लोकांशी ओळखी करून घेतल्या आणि एका राजकीय पक्षांत सामील झालों. बौद्धिक विषयांचा अभ्यास मी केला असता व माझ्या आयुष्याला चांगलें वळणहि लागलें असतें. माझी बुद्धि तशीच तीक्ष्ण होती.

**अकुलिना**:--होय, अगदीं बरोबर आहे.

**पांथस्थ**:--पण येथेंहि एक विघ्न आलें जनतेच्या आयुष्याचा चुराडा करणारी जुलमी सत्ता त्याच्या आड आली. मला तुरुंगांत जावें लागलें. माझें स्वातंत्र्य नाहीसें झालें व मला छळ सोसावा लागला.

**मार्था**:--पण हें सर्व कशाकरितां ?

**पांथस्थ**:--आमच्या हक्कांकरितां.

**मार्था**:--असे ते हक्क तरी कोणते ?

**पांथस्थ**:--कोणते म्हणजे ? धनिक वर्गानें आळसांत राहून चैन करू नये व सामान्य जनतेला तिच्या श्रमाचें फळ चाखता यावें, हेच ते हक्क.

**अकुलिना**:--आणि जमीन पुन्हां आपल्या ताब्यांत घ्यावी, असंच कीं नाही ?

**पांथस्थ**:--होय, उघडच आहे. शेतकरी लोकांच्या हक्कांचाहि यांत समावेश होतो.

**अकुलिना**:--ईश्वर तुमच्या कार्यांत यश देवो. जमीन नसल्यामुळें आम्हां गरिबांचे हाल होत आहेत बरं मग आतां ही चळवळ कशी काय चालली आहे ?

**पांथस्थ**:--आतां ? तें मला कांहीं ठाऊक नाहीं. पण मी आतां मास्कोला चाललों आहे. मजुराला लुबाडणाऱ्या एका कारखानदाराकडे जात

आहे. काय, करायचें काय ? नाक मुठींत धरून गेलंच पाहिजे. त्याच्याकडे जाईन व कसेंहि करून कामावर घ्या अशी मी त्याला विनंति करीन.

**अकुलिनाः**--बरं, आणखी थोडा चहा घ्या.

**पांथस्थः**--तुमचे माझ्यावर फार उपकार झाले.

[ बाहेरच्या बाजूस गडबड व आवाज ऐकू येतो. ]

**अकुलिनाः**--हा मायकेल आला ! कसा अगदीं वेळेवर आला !

**मार्थाः**--[ उठून उभी राहते. ] अगबाई, इग्नाट त्याच्याबरोबर आहे झालं, खात्रीनें दारू झोंकली असेल !

[ मायकेल व इग्नाट दोघे झोंके खात खात आंत येतात. ]

**इग्नाटः**--कां, तुमचें सर्वांचें ठीक आहे ना ? [ मूर्तीपुढें उभा राहून क्रॉसचें चिन्ह करतो. ] हे आम्ही आलों आलों. कसें अगदीं चहाच्या वेळेला आलों कीं नाहीं ? चर्चमध्यें गेलों. प्रार्थना संपून गेली होती. हॉटेलांत गेलों तों खायलाच कांहीं नव्हतें सगळे लोक खाऊन पिऊन फस्त करून गेले होते. पण गुत्त्यावर गेलों ते कसे अगदीं वेळेवर ! नुकतीच सुरवात झाली होती ! हा ! हा !! हा !!! आम्हांला तुम्ही चहा द्या. आम्ही तुम्हांला दारू देऊं. म्हणजे बाजार कसा बरोबर झाला ? [ हंसूं लागतो. ]

**मायकेलः**--हा उडाणटप्पू कोठून आला ? [ पाहुण्याकडे बोट दाखवितो. कोटाच्या आंतल्या खिशांतून एक बाटली बाहेर काढतो. ती टेबलावर ठेवतो. ] चला, कप घेऊन या.

**अकुलिना**--बरं, तुमचा सवदा कसा काय झाला ?

**इग्नाट**--खूपच मजा झाली. गुत्त्यावर गेलों, तिथं झोकली व घरींहि आणली.

**मायकेल**--[ कपांतून दारू ओततो. एक कप आईला देतो व एक पाहुण्याला देतो. ] घ्या, तुम्हीहि घ्या !

**पांथस्थ**--[ कप हातांत घेऊन ] तुमचा फार आभारी आहे. तुमचं भलं होवो. [ कप रिकामा करतो. ]

**इग्नाट**—वा: जानी दोस्त! कसं पण पितो आहे घटाघट! तहानेनं कसा अगदीं घाबरून गेला आहे! [ आणखी थोडी दारू ओततो. ]

**पांथस्थ**--[ पितो. ] तुमच्या धंद्याला बरकत येवो!

**अकुलिना**—बरं, गवताच्या ओझ्याला चांगले पैसे आले कां?

**मायकेल**—कां? आलेच पाहिजेत? त्याची काळजी करायचं कारण नाहीं. शंभर वर्षांत माणसानं एकदां केव्हां तरी मजा केलीच पाहिजे.

**मार्था**—असा का झुकांड्या खातोस? हें कांहीं बरं नाहीं. घरांत खायला भाकरीचा तुकडा नाहीं आणि तुला काय अवदसा आठवली आहे पहा!

**मायकेल**--[ धमकीच्या आवाजांत ] मार्था, मार्था!

**मार्था**--बरं, मार्थाला काय जाळायचं आहे. होय, मला सगळं माहीत आहे. तुझ्या त्या तोंडाकडे पाहिलं म्हणजे मला कशी अगदीं चिळस येते!

**मायकेल**--मार्था, मार्था, पहा बरं!

**मार्था**—काय, पहायचंय काय?

**मायकेल**—ओत, कपांतून दारू ओत व सर्व पाहुण्यांना दे.

**मार्था**—बस, पुरे कर, कुतरड्या, तुझ्याशीं मला बोलायचं नाहीं.

**मायकेल**--काय, बोलायचं नाहीं, काय, भिकारडे, काय म्हणालीस?

**मार्था**--[पाळण्याला झोंका देते. पारस्का घाबरून जाऊन तिला बिलगते.] मी काय बोललें? मला तुझ्याशीं बोलायचं नाहीं, असं म्हणालें.

**मायकेल**—कां? बिसरलीस वाटतें! [ तिच्याकडे धांवत जातो. तिच्या डोक्यावर ठोसे देतो. ] एक!

**मार्था**--ओय, ओय, ओय! [ रडत व धांवत दाराकडे जाते. ]

**मायकेल**—कुठं, चाललीस कुठं? रांड कुठली! [ पुन्हां तिच्या आंगावर धांवतो. ]

**पांथस्थ**—[ धांवत येऊन त्याचा हात धरतो. ] हें असं करणें बरं नाहीं. तुम्हाला कांहीं तसा हक्क नाहीं.

**मायकेल**--[ थांबतो. पाहुण्याकडे आश्चर्यानें पाहतो. पुन्हां मार्थाकडे पाहातो.] तुला बदडून काढल्याला कांही फार दिवस झाले नाहींत !

**पांथस्थ**--स्त्रीजातीचा असा अपमान करणें योग्य नाहीं.

**मायकेल**—ए कुत्रीचे बच्चे, कां पाहिजे का ! [ मूठ वळून दाखवितो.]

**पांथस्थ**—स्त्रीजातीवर मी असा जुलूम होऊं देणार नाहीं.

**मायकेल**—बस, असा एक ठेवून देईन कीं, बत्तीशी जाग्यावर रहायची नाहीं.

**पांथस्थ**--हां ! द्या ठोसा, कां, कां, देत नाहीं ? [ तोंड पुढें करतो. ]

**मायकेल**—[ खांदे उडवतो व अस्तनी मागें सारतो. ] खरोखरींच ठेवून दिल्यावर समजेल.

**पांथस्थ**—मग घाबरलात कां ? द्या ठेवून !

**मायके** —बरं, खरेंच भोळसट दिसतां. [ हात मागें घेतो. ]

**इग्नाट**—[ पाहुण्याला उद्देशून ] तुम्ही बायकांचे बरेच कैवारी आहांत म्हणायचे !

**पांथस्थ**—त्यांच्या हक्कांचें रक्षण करणें माझं काम आहे.

**मायकेल**—[ टेबलाकडे येत येत मार्थाला उद्देशून ] बरं मार्था, त्याच्या नांवानें देवापुढें एक मेणबत्ती लाव. तो मध्यें आला नसता तर तुला मर मरेतों बदडून काढलें असतें.

**मार्था**—तुझ्या हातून दुसरं काय व्हायचंय ! माणसानं जन्मभर भाकऱ्या भाजत व स्वयंपाक करत रखडावं अन् थोडं कांहीं बोललं कीं·········

**मायकेल**--बसं, पुरें, पुरें. [ पाहुण्याला दारू देतो. ] प्या. [ बायकोला उद्देशून ] तुझी ही एवढी बडबड कां चालली आहे? माणसानं थोडीसुद्धां गंमत करूं नये ? बरं, हे घे. [ तिला पैसे देतो. ] जा, ठेवून दे. तशाच तीन रुबलच्या या दोन नोटा ठेवून दे.

**मार्था**--चहा व साखरेचं काय झालं ?

**मायकेल**--[ खिशांतून पार्सल बाहेर काढतो व बायकोच्या हातांत देतो. मार्था पैसे व पार्सल घेते व खोलींत जाते. जातां जातां केंस सांवरते.] या

बायकांना कांही कळत नाहीं. [ पाहुण्याला पुन्हां दारू देतो. ] ही घ्या. पिऊन टाका.

**पांथस्थ**—[ नाकारतो. ] घ्या, आतां तुम्हीच घ्या.

**मायकेल**—या, असें लाजूं नका.

**पांथस्थ**—[ पितां पितां ] तुमच्या धंद्याला बरकत येवो !

**इग्नाट**--[ पाहुण्याला उद्देशून ] तुम्हीं बरेच देश पाहिले असतील ! ओहो ! तुमचा कोट किती सुंदर आहे ! अगदीं नव्या फॅशनचा ! हा तुम्हाला कोठें मिळाला ? ( पाहुण्याच्या फाटक्या जाकिटाकडे बोट दाखवून ) तुम्ही तो शिवून नीट कां करीत नाहीं ? तो बराच जुना होत चालला आहे. माझा कोट जर असा असता तर माझ्यावर बायका भुलून मरून पडल्या असत्या. (मार्थाला उद्देशून) कां, खरं आहे कीं नाहीं ?

**अकुलिना**---इग्नाट, असं करूं नये. तो कोणत्या परिस्थितींत आहे हें माहीत नसतांना एकाद्या माणसाचा उपहास करणं बरं नाहीं.

**पांथस्थ**--हा त्याच्या अडाणीपणाचा व अशिक्षितपणाचा परिणाम आहे.

**इग्नाट**—मी सहज आपला गंमतीनें बोललों. कोणाला दुखवण्याचा माझा हेतु नव्हता. घ्या. ( दारूचा कप पुढें करतो.)

**अकुलिना**---तो स्वतःच सांगतो कीं, सर्व दुःखांचें मूळ दारू आहे. आणि या दारूपायींच तो एकदां तुरुंगातहि गेला होता.

**मायकेल**--तुम्ही तुरुंगांत का पडला होता ?

**पांथस्थ**--( शिगून जाऊन ) दुसऱ्याचा माल घेतल्यामुळें मला तुरुंगांत जावें लागलें.

**मायकेल**--काय म्हणतां ! कशाकरितां गेलांत ?

**पांथस्थ**--हें पहा, असें केलें. एकाद्या श्रीमंत माणसाकडे जाऊन, "तुझ्या-जवळचे पैसे दे, नाही तर हें पहा पिस्तूल," असें त्याला म्हणायचें. अशा रितीनें त्याला भीति दाखवून त्याच्याकडून २३०० रुबल मी लुबाडून घेतले.

**अकुलिना**—अग बाई !

**पांथस्थ**--आम्ही त्या पैशाचा योग्य विनियोग करणार होतों. झेनिको ह्रा आमचा पुढारी होता. पण सरकारी लांडग्यांनीं आमच्यावर एकाएकीं छाप घातली, आम्हांला पकडलें व तुरुंगांत टाकलें.

**इग्नाट**—तुमच्याजवळील पैसेहि काढून घेतले !

**पांथस्थ**—अर्थात् ! फक्त माझ्यावर सरळ सरळ चोरीचा आरोप त्यांना ठेवता आला नाहीं. चौकशीच्या वेळीं सरकारी वकील मला म्हणाला कीं, " तुम्ही पैसे चोरले आहेत. " मी त्याला सरळ उत्तर दिलें, " चोर असतात ते चोरी करतात. पण आम्ही आमच्या पक्षाच्या चळवळीकरितां दुसऱ्याचा माल आपल्या ताब्यांत घेतला." यावर काय बोलावें हें वकीलाला समजलें नाहीं. त्यानें बऱ्याच लटपटी केल्या. पण माझें म्हणणें त्याला खोडून काढता येईना. शेवटीं त्यानें " मला तुरुंगांत टाकावें " म्हणजे माझा स्वतंत्र राहण्याचा हक्क हिरावून घ्यावा, असें सांगितलें.

**इग्नाट**--कसा हुशार आहे, अगदीं पक्का बिलंदर ! कुत्रीचे बच्चे ! ( दारू पुढें करून ) पी, आणखी पी.

**अकुलिना**--हें काय असं, किती घाणेरडं बोलतो आहेस !

**इग्नाट**—नाहीं, आजी, त्याची आई कोण होती, हें कांहीं मी सांगत नाहीं. माझं बोलणं हें असंच.

( मार्था परत येते. आणि टेबलावरील कपांतून चहा ओतते. )

**मायकेल**--छान्, असें पाहिजे. मनांत कांहीं ठेवूं नये. हे सर्व पाहुण्यांचे उपकार आहेत. ( पाहुण्याला उद्देशून ) कां, तुम्हाला कसें काय वाटतें ! ( मार्थाला आलिंगन देतो. ) पहा, माझ्या बायकोवर माझं कसं प्रेम आहे ! अगदीं एका शब्दांत सांगावयाचं म्हणजे ती तशीच छबकडी आहे. तिला सोडून मी दुसरीकडे ढुंकूनहि पाहणार नाहीं.

**इग्नाट**--वाहवा, खूप झाली. आजी, पी, पी, कां पीत नाहींस !

**पांथस्थ**—या सगळ्याचा अर्थ काय ! ही सर्व दारूची निशा. माणूस प्रथम कसा उदासीन असतो. पण आतां पहावं तों काय, आनंदी आनंद.

आजी, तुमच्याबद्दल मला प्रेम वाटतें, तुमच्या सगळ्यांच्याबद्दल प्रेम वाटतें. तुम्ही आम्ही भाई भाई. ( क्रांतिकारकांचें गीत म्हणतो. )

**मायकेलः**--खूब झिंगली आहे स्वारी. त्याला भूक लागली होती व हवी तेवढी दारू प्यायला मिळाली. मग काय, असाच बडबडायचा !

---

# अंक २ रा

---

[ तीच झोंपडी. सकाळची वेळ. ]

**मार्थाः**--[हातांत कुऱ्हाड घेते.] थोडं तरी सरपण तोडून आणलंच पाहिजे.

**अकुलिनाः**--[ हातांत पोहरा घेऊन ] पाहुणा नसता तर काल त्यानें तुला बदडून बदडून काळी निळी करून सोडलं असतं. तो कुठं दिसत नाहीं ? तो गेला कां काय ? मला वाटतें तो गेलाच. [ एकामागून एक बाहेर जातात.]

**मायकेलः**--[ चुलाणावरल्या, ओटयावरून खालीं उतरतो. ] काय, सूर्य चांगलाच वर आला. [ बूट घालतो. ] आईबरोबर पाणी आणण्याकरितां ती गेली असेल. कपाळ तरी काय दुखतंय ! पुन्हां नांव घ्यायचा नाहीं. [ मूर्तीपुढें उभें राहून क्रॉसचें चिन्ह करतो, प्रार्थना करतो व नंतर हात पाय तोंड धुतो. ] आतां जाऊन घोडयावर जीन चढवलंच पाहिजे.

[ मार्था सरपण घेऊन आंत येते. ]

**मार्थाः**--कालचा तो भिकारी कुठं आहे ? गेला कां काय ?

**मायकेलः**--गेलाच असला पाहिजे. कुठं दिसत तर नाहीं.

**मार्थाः**--बरं, गेला तर गेला. कांहीं असलं तरी तो हुशार होता खास !

**मायकेलः**--बरोबर आहे. त्यानं तुझा कैवार घेतला ना ?

**मार्थाः**--त्यांत काय मोठंसं !

[ मायकेल आंगांत कोट घालतो. ]

**मार्था**:--काय ! तो चहा अन् साखर कुठं आहे ? तूं दुसरीकडं उचलून ठेवलीस कीं काय ?

**मायकेल**:--मला वाटलं तूं उचलून ठेवली असशील.

[ पाण्यानें भरलेला पोहरा घेऊन अकुलिना येते. ]

**मार्था**:--[ अकुलिनाला उद्देशून ] आपण तें कालचं पार्सल उचलून ठेवलं काय ?

**अकुलिना**:--नाही. मला कांहीं ठाऊक नाहीं. मीं तें पाहिलं सुद्धां नाहीं.

**मार्था**:-- काल रात्रीं मी तें खिडकींत ठेवलं होतं.

**अकुलिना**:--होय, मीं तिथं कांहीं पाहिलं खरं !

**मार्था**:--मग तें गेलं तरी कुठं ? [ शोधूं लागतात. ]

**अकुलिना**:--खुळचट मेली ! लाज कशी नाहीं ?

[ शेजारी प्रवेश करतो. ]

**शेजारी**:--काय ! मायकेल, लांकडें आणण्याकरितां बाहेर पडायचें का ?

**मायकेल**:--होय, पडलेंच पाहिजे. मी घोड्यावर खोगीर घालीतच होतों. पण आमच्या घरची एक वस्तु हरवली आहे.

**शेजारी**:--गबाळ कुठले ! काय, हरवलें तरी काय ?

**मार्था**:--हें पहा, काल माझ्या म्हाताऱ्यानं गांवांतून एक चहासाखरेचं पार्सल आणलं. तें मीं खिडकींत ठेवून दिलं. नंतर दुसरीकडं नीट उचलून ठेवायचं मी विसरून गेलें. अन् आतां पाहावं तों तें कुठं दिसत नाहीं.

**मायकेल**:--आमच्या मनांत एक पाप आलें आहे. कालच्या पाहुण्यानें आमच्या घरीं रात्र काढली त्याचा आम्हाला संशय येत आहे.

**शेजारी**:--तो पाहुणा कसा होता तरी कसा ?

**मार्था**--होय, तो थोडा पातळ अंगाचा आहे, त्याला दाढी बिढी कांहीं नाही.

**मायकेल**:—त्याच्या कोटाच्या चिंध्या झाल्या आहेत.

**शेजारी**:--केस कुरळे आहेत व नाक चोंचीसारखें आहे.

**मायकेल**--होय ! होय !

**शेजारी**:--मी त्याला आतां नुक्तेंच पाहिलें व तो अशा जलदीनें कां चालला आहे याचें मला आश्चर्य वाटलें.

**मायकेल**:--मग तो तोच असला पाहिजे. तो होता कुठें !

**शेजारी**:--तो अजून पूल ओलांडून गेला असेल, असें वाटत नाहीं.

**मायकेल**:--[ झटकन टोपी घेतो व शेजाऱ्यासह जलदीनें बाहेर पडतो. ] त्या चोराला आतां पकडून आणतों. तोच असला पाहिजे.

**मार्था**:--किती शरमेची गोष्ट आहे. खरोखरीच शरमची गोष्ट आहे.

**अकुलिना**:--आणि समज तो नसला तर? वीस वर्षांपूर्वीची गोष्ट. घोडा चोरल्याचा आळ एका माणसावर आला. लोकांची गर्दी झाली. एक-जण म्हणाला, "घोडयाला धरतांना मी स्वत: त्याला पाहिलें." दुसरा म्हणाला, "मी त्याला घोडा नेतांना पाहिलें." चांगला मोठा अरबी घोडा होता. तसा झांकून जाण्यासारखा नव्हता. सगळे लोक त्या घोडयाला शोधण्या-करितां रानांत गेले व त्या ठिकाणीं ज्याचा वहीम घेण्यांत आला होता तो मुलगा सांपडला. "तो तूंच आहेस, घोडा कुठं आहे सांग," लोक त्याला म्हणूं लागले. त्यानें इनकार केला व आपण पूर्णपणें निर्दोषी असल्याचें शपथेवर सागितलें. "त्याचें ऐकून करायचें काय? बायका तर अगदीं हाच चोर आहे असें सांगतात," असें लोक म्हणाले. यानंतर तो कांहीं भलतें सलतेंच बोलला. जॉर्ज लॅपुष्किन फारच रागीट माणूस होता. त्यानें त्याच्या चांगली थोबाडांत लगावली. "तूंच आहेस," असें म्हणून त्याला तो मारूं लागला. झालें, सगळेच लोक त्याच्यावर घसरले. कोणीं बुक्या मारल्या, कोणीं गुद्दे लगावले व कोणीं काठयांनींहि त्याला झोडपलें. पोरगा मारानें बेशुद्ध झाला व लगेच थोडया वेळांत मेलाहि. अन् पुढें काय झालं, माहीत आहे? दुसरे दिवशीं खरा चोर सांपडला. आदल्या दिवशीं मारलेला मुलगा आपल्या झोंपडीच्या वाश्याकरितां चांगलें लांकूड कोणतें, हें पाहण्यासाठीं रानांत गेलेला होता असें समजलें.

**मार्था**:—होय, अगदीं खरं आहे, आमच्या मनांत त्या पाहुण्याबद्दल पापी विचार येण्याचाहि संभव आहे. तो हलक्या जातीचा आहे पण चांगला माणूस दिसला.

**अकुलिना**:—होय, तो अगदीं कंगाल स्थितीला पोंचला आहे. त्याच्या संबंधानें यापेक्षां जास्त अपेक्षा ती काय करायची ?

**मार्था**:—ते गलगा करीत आहेत. मला वाटतें, ते त्याला परत घेऊन येत आहेत.

[ मायकेल, शेजारी, एक म्हातारा व मुलगा पाहुण्याला पुढें ढकलीत ढकलीत प्रवेश करतात.]

**मायकेल**:—[ हातांत पार्सल घेऊन मार्थाला उद्देशून रागानें बोलतो. ] हें त्याच्याजवळ सांपडलें. [ पाहुण्याला उद्देशून ] चोरा, कुत्र्या !

**अकुलिना**:—[मार्थाला उद्देशून] तोच आहे. गरीब बिचारा, पहा, त्यानें आपलं डोकं कसं खाली घातलं आहे !

**मार्था**:—आपण दारू प्यालेलों असलों म्हणजे आवाक्यांत आलेली वस्तु-आपण गडप करतो, असं तो स्वतःच काल म्हणाला होता नाहीं ?

**पांथस्थ**:—मी चोर नाहीं. मी दुसऱ्याचा माल आपल्या ताब्यांत घेणारा आहे. मी मजूर आहे. मला जगलंच पाहिजे. तुम्हांला तें समजायचें नाहीं. तुम्हांला माझें काय करायचें असेल तें करा.

**शेजारी**:—गांवच्या सर पंचाकडे न्या किंवा थेट पोलिसच्या स्वाधीन करा.

**पांथस्थ**:—तुम्हाला काय वाटेल तें करा असें मी तुम्हांला सांगतों आहे. माझ्या तत्वांकरितां मी कष्ट सहन करायला तयार आहें. तुम्ही सुशिक्षित असता तर मी काय म्हणतों, हें तुम्हांला समजलें असतें.

**मार्था**:—[ नवऱ्याला उद्देशून ] समजा, देवाचं नांव घेऊन आपण याला सोडून दिलें तर.? आपल्याला आपलं पार्सल मिळालंच आहे. जाऊं दे त्याला, आपल्या हातून आणखी दुसरं पाप व्हायला नको.

**मायकेल:**—[ पुन्हां तेच शब्द उच्चारीत ] "आणखी दुसरं पाप." अगदीं उपदेश करायला लागलीस ? जसं कांहीं तुझा सल्ला घेतल्याशिवाय या बाबतींत काय करायचं, हें कोणाला समजायचंच नाहीं !

**मार्था:**—कां ! समजायचं नाहीं ? मग द्याना सोडून !

**मायकेल:**—म्हणे "सोडन द्या." तूंच नको सांगायला ! आम्हांलाहि कळत. "सोडून द्या !" त्याला जाऊं दे पाहिजे तर. पण त्याच्या मनाला क्षिति वाटेल असे दोन शब्द तरी त्याला सांगायला पाहिजेत ! [ पाहुण्याला उद्देशून ] हे पहा, माझें ऐका. जरी तुम्ही अगदीं गरीब स्थितींत आहां तरी तुम्ही मोठा गुन्हा केला आहे. अगदीं मोठ्ठा गुन्हा केला आहे. दुसरा कोणी असता तर त्यानं तुमच्या बरगड्या मोडून टाकल्या असत्या व पोलिसकडे नेऊन गुदरलें असतें. तुम्हाला एक असें सांगावयाचें आहे की, तुमचें नुकसान करण्याची माझी इच्छा नाहीं. [ थोडा थांबतो. प्रत्येक जण अगदीं स्तब्ध असतो. नतर तो गभीरपणानें बोलूं लागतो. ] जा, ईश्वर तुम्हाला सुबुद्धि देवो. पुन्हां तसं करूं नको [ बायकोकडे पाहतो. ] आणि तुला वाटलं मीच काय ती शहाणी ! अशा वेळीं काय करायचं हें मीच सांगू शकतें.

**शेजारी:**—मायकेल, हें असं करूं नका, असं नका करूं ! असें करून तुम्ही अशीं कृत्यें करण्याला उत्तेजनच देत आहां.

**मायकेल:**—[ पार्सल अद्याप हातांतच असतें. ] मीं काय करावें आणि काय करूं नये हें मी ठरवायचें माझें काम आहे. [ बायकोला उद्देशून ] आणि तूं मला शिकवायला निघालीस ! [ थांबतो. पार्सलकडे पाहतो. नंतर बायकोकडे पाहतो आणि मनाचा निश्चय करून पार्सल पाहुण्याच्या हातांत देतो. ] हें घ्या. वाटेंत उपयोगी पडेल. [ बायकोला उद्देशून ] आणि तुला वाटलं मीच काय ती सज्जन ! [पाहुण्याला उद्देशून] जा, तुम्हाला मी जा म्हणून सांगितलें आहे. मग जा तर, असें मागं पुढं कांहीं नको.

**पांथस्थ:**—[ पार्सल हातांत घेतो, सगळे गप्प राहतात. ] तुम्हांला वाटतें मला कांही समजत नाहीं. [त्याचा आवाज कापरा होतो.] मला सगळें चांगलें

समजते. तुम्ही कुत्र्यासारखें मारें झोडपून काढलें असतें तर मला यापेक्षांहि कमी दुःख झालें असतें. मी कोण आहे, हें मला समजत का नाहीं ! मी लुच्चा आहे, चोर आहे, हलकट, नीच, पाजी माणूस आहे. देव तुमचें भलें करो, मला क्षमा करा. [ हुंदके देऊं लागतो. टेबलावर पार्सल टाकून देतो व बाहेर गडबडीनें निघून जातो. ]

**मार्था:**—तो चहा घेऊन गेला नाहीं, हें एक बरंच झालं. नाहीं तर आजचीच पंचाईत झाली असती.

**मायकेल:**—[ बायकोला उद्देशून ] आणि मीच काय तो शहाणो असं तुला वाटलं नाही का ?

**शेजारी:**—तो कसा रडूं लागला, गरीब बिचारा !

**अकुलिना:**—तो देखील मनुष्यच आहे.